जमीनीवरील व्यक्तिगत मालकीच्या पापाचा घडा आता भरला आहे त्यामधून निर्माण झालेले झगडे म्हणजे प्रसूतिकाळची वेदनाच होती आता नवजीवन जवळ आहे. लोकाच्या बऱ्याच दिवसापासूनच्या दुःखाचा आता अंत होणार आहे या भीषण व विश्वव्यापी पापाचा अंत मनुष्य जातीच्या इतिहासात युगांतरकारी होईल

—टॉल्स्टॉय

भूतदया व मानवी हक्क याच्या दृष्टीने जर आपली अशी खात्री झाली की मनुष्यजातीला निदान आणखी काही काळ तरी चैन करणे शक्य नाही व चैनीबरोबरच जगात किती तरी आपत्ति नांदत आहेत तर चैन करण्याची इच्छा आपणापैकी कोणास होईल काय याचा विचार करा मनुष्य कितीहि निष्ठुर असला तरी त्यानें आपल्या डोळ्यावर कातडें ओढल्याखेरीज आपल्या ताटातील पक्वान्नें तो खाऊ शकणार नाही हे डोळयावरचे कातडें धीटाईने दूर करा आणि प्रकाशाकडे पहा जर जगातील दलिताची दुःखें पाहून तुमच्या डोळ्यातील तेज अश्रूंनी मंद झाले तर तसेच अश्रू ढाळीत जगभर संचार करा आणि संतानी पेरलेल्या उपदेशाच्या बीजावर अश्रुजलाचे सिंचन करून त्याचे संगोपन करा असे कराल तरच कष्ट करण्यास तयार असलेल्या प्रत्येकास अन्न आणि शांति याचा लाभ होईल दैवी साम्राज्याचा भूतलावर अवतार होईल

—रस्किन

पूर्वीचे लोक असे मानीत की क्रांतिसाठी एखादा महात्मा, राजा किंवा वीरपुरुष लागतो मार्क्स आला व त्याने असे शिकविले की राजे, वीरपुरुष किंवा महात्मे क्रांति करीत नाहीत. तर देशातील मजूर क्रांति करतील विनोबा म्हणतात की ही क्रांति या देशातील शेतकरी करतील

—दादा धर्माधिकारी

# ग्राम राज्य



लेखक

ठा. कि. बग



साधना सदन प्रकाशन, वर्धा.

किं सहा आणे )  जुलै १९५७  ( नवीन ३७ पैसे

# अनुक्रमणिका



---

प्रकरण पहिलें

# 'तमांतून ज्योतीकडे'

आपला देश हा खेड्याचा देश आहे आपला भारत स्वतंत्र होण्यास दहा वर्षे झाली. आज आपल्या देशाची काय स्थिति आहे ? भारतात आजहि पुरेसे अन्न पैदा होत नाही म्हणून कोटयवधि रुपयाचे अन्न बाहेरून मागवावे लागत आहे गरीबी मिटली नाही, सर्वास काम मिळाले नाही ज्या भागात दारूबदी झाली त्या भागात गावोगाव दारू पिणे सर्रास चालू आहे. गावोगाव दारू तयार करण्याचा एक नवीन उद्योग सुरु झाला आहे. असे लोक म्हणतात स्पृश्याच्या व नवबौद्धाच्या चकमकी उडत आहेत. तरुण मुले सामाजिक सुधारणा करण्याची गोष्ट कानावरहि घेत नाहीत. जेथे मुलाची ही कथा, तेथे मुलीची काय बिशाद ! मजूर मन लावून शेतात, कारखान्यात किंवा कोठेहि काम करीत नाहीत हा तर नित्याचाच अनुभव कितीहि सुरक्षितता ठेवा व चोरास कोणतीहि शिक्षा ठोठावा, चोऱ्या बद झाल्या नाहीत सावकारास हृदय नाही अशा चोहीकडे त्यास शिव्या देण्याचा सर्रास कार्यक्रम सुरू आहे लोभ तर कोणासच सुटला नाही, म्हणून प्रत्येकजण दुसऱ्यास गरीब करून स्वत धनी होतो. चढा-ओढीत हे चालणारच असे सर्व मानून चालतात

तसेच खेड्याच्या माणसाचें जीवन आज किती चिंतामय व पराधीन बनलेले आहे! 'अवदा पीकपाणी कसे येईल' ही तर जुन्या

काळापासून चालत आलेली चिंता आहे. आता पुन्हा अन्नधान्याचे व कापसाचे भाव काय निघतील ही नवीन चिंता लागली. कापड, लोखंड, साखर, तेल आदि वस्तूचे भाव काय राहतील ही चिंता आहेच. शिक्षणास काय खर्च येईल कोण जाणे! शिक्षणानंतर मुलास बापाचा धंदा करण्यात शरम वाटते व शहरात नोकरी मिळते की नाही कोणास ठाऊक; सावकाराकडून किती व्याजाने कर्ज मिळेल, तकावी मिळते की नाही व मिळाली तरी तिचा भाव ( लाच ) काय आहे ही काळजी आहेच. सरकार व ग्रामपंचायत कोणकोणते कर लावून आपल्यापासून किती पैसा ओढणार आहे कोणास माहित! फावल्या वेळात शेतकऱ्याना व मजुराना आणि नेहमीच कारागिराना काम मिळेल की नाही याची गॅरंटी कोणी द्यावी? अशा रीतीने व्यापारी, सावकार व सरकार याच्या बंधनानी आजचा खेडुत पूर्णपणे जखडला आहे. जन्मापासून मरणापर्यंत सारा जन्म उद्याच्या चिंतेत जातो. मरणाशिवाय कशाचीच शाश्वति नाही चिंतेची काळी छाया प्रत्येकाच्या तोंडावर आहे. काय हे जीवन! केव्हा ही चिंता मिटेल? केव्हा अनिश्चितता संपेल?

एकीकडे हिंदुस्थानचे, बहुतेक सर्व खेड्याचे चित्र असे आहे. आणि दुसरीकडे?

मंगरोठ नावाचे उत्तरप्रदेशात एक गाव आहे. हेच भारतांतील पहिले ग्रामदान. येथील शेतकऱ्यानी आपली सर्व जमीन भूदानयज्ञात अर्पण केली. पूर्वी तेथे सहा महिने गावकऱ्याना

पुरेल एवढेंच अन्न पैदा होत असें. ज्वारीहि बारा महिने खायला मिळत नसें. ग्रामदानानंतर शेतींत सुधारणा होऊं लागली. सर्वांची शक्ति व बुद्धि गांवाचें उत्पन्न वाढविण्यांत लागली. प्रत्येकाने एकेकट्यापुरतें पाहणें सोडलें. दरएक गांवाचें हित पाहूं लागला. परिणाम असा झाला कीं, आता वर्षभर पुरून उरेल इतकें अन्न पैदा होत आहे. घरोघर गव्हाची पोळी लोक खातात. ग्रामदान म्हणजे उपासमारीऐवजी घरोघर गव्हाची पोळी असा अर्थ तथील लोकांनी लावला तर त्यांत नवल तें कसलें? तीच गोष्ट ओरिसामधील गरांडा गांवाची. या गांवाने दोन वर्षांपूर्वी ग्रामदानाचें पाऊल उचललें. तेथील लोकांनी श्रमदानाने तलाव खोदला व जपानी पद्धतीने भातशेती केली. एका वर्षातच तेथील उत्पन्न तिपटीने वाढलें आहे. बिहारमधील सेन्हा गांवांत पूर्वी खाण्यापुरतेंहि अन्न पैदा होत नव्हतें. आज सर्वांच्या गरजा भागून अन्न बाहेर जात आहे.

अकेली गांवाची आपण गोष्ट घेऊं. गंजाम जिल्ह्यांतील ओरिसामधील या छोट्याशा गांवाने ग्रामदान केल्यावर म्हटलें, "आपण सर्व काळ्या आईचीं ( धरणीमातेचीं ) लेकरें. म्हणून आपण भावंडें झालों. मग आपसांत शिवाशिव कशी पाळणार! दारू पिणार नाहीं." दारूचीं मडकी त्यानी फोडून टाकलीं. तीच गोष्ट विदर्भातील माईची. वाई हें विदर्भातील पहिलें, ग्रामदान. अमरावती जिल्ह्यांतील मोर्शी तालुक्यांतील हें गांव या वर्षी जानेवारी तीसला ग्रामदान झालें. दहा बारा हजार

रुपयाची दारू तेथे दरवर्षी तयार होत होती  व लोक दारू पीत होते  आता तेथे दारू काढणें व पिणे बद झाले आहे

स्पृश्य व अस्पृश्य याचे सबध कसे आहेत हें पाहण्याकरिता पुन्हा अकेलीचेच उदाहरण घेऊ  अकेली येथील अस्पृश्य लोकाना काही मतलबी लोकानी फितविले  त्यामुळे त्या अस्पृश्यानी ग्रामदानानतर झालेल्या वाटपात मिळालेल्या जमीनी परत केल्या त्यावेळेस गावातील स्पृश्य त्याच्याकडे गेले व त्याना म्हणाले की तुमचा धर्म तुमच्याबरोबर व आमचा धर्म आमच्याबरोबर. तुम्ही जमीन घेत नसाल तरी आम्ही ती जमीन तुमचीच मानू  तिची तुमच्यातर्फे आम्ही फुकट मशागत करू  जे पीक येईल ते आम्ही तुमच्या घरी पोहोचते करू  वज्राचे हृदयहि अशा वर्तनाने वितळले असते  अकेलीचे अस्पृश्य तर माणसेच होती  तेथील अस्पृश्य या उत्तराने खजील झाले  त्याच्यातील कलि पळाला. त्यानी जमीनीत मेहनत करण्याचे ठरविल  पूर्वी गाव अकेली होतें म्हणजे एकटें होतें  आता एकट राहिल नाही  ग्रामदान झाले ! म्हणून अकलि झाले  कलि पळाला  अशा रीतीने जेव्हा अके-लीत शिवाशिव व दारू बद झाली तेव्हा देवाने अकेलीची कसोटी पाहिली  देव भक्ताची कधी कधी कसोटी पाहतो  जो कसोटी घेतो तोच भक्ताना कसोटीतून पार पडण्याचे बळहि देतो  गावा-तील चार मुले लग्नायोग्य झाली  इतर गावच्या लोकानी ठरविलें की ज्यानी शिवाशिव, दारू व जमीनीची मालकी सोडली त्याना आम्ही आपल्या मुली नाही देणार  झाले अकेलीवर सामाजिक

बहिष्कार सुरू झाला. मग एक चमत्कार झाला. जवळच्या गांवच्या चार उपवर मुली एके दिवशीं अकेलीत आल्या. जे दारू पीत नाहीत व ज्यानी जमीन गांवाची केली अशा तरुणांशीच आम्ही लग्न करूं असे त्यानी सांगितले. लग्नें झालीं. त्या दिवशीं अकेलीत कोण आनद !

वाईतील लोकांनी सामूहिक शेती करण्याचें ठरविलें. काल-पर्यंत मन न लावून काम करणारे ते मजूर ! त्यांच्यांत एका रात्रीत फरक पडला. सर्वांची मालकी झाल्यावरोवर त्यांचीं मनें मंतरलीं गेली. वाईतील सर्व लोक आज सकाळीं चार वाजतां घांटेसरशीं उठतात. पांचला शेतीत कामावर हजर राहतात. रात्री आठ वाजतां प्रार्थना होते. त्यांत गांवचे सर्व लोक हजर असतात. प्रार्थनेनंतर दुसऱ्या दिवसाच्या कामाची योजना बनवितात. तेथील लोकांनी याच वर्षी दोनशे एकर पडित जमीन उठित केली आहे. पूर्वीच्या चारशे एकर जमीनीत तर मशागत होतच आहे.

ओरिसांतील बालेश्वर जिल्हा. त्या जिल्ह्यांतील पाखरा नांवाचे एक गांव. तें ग्रामदान झाले. अजून जमीनीचे वांटप झालें नव्हतें. तेथें एका सरावलेल्या चोरास लोकांनी पकडलें. त्याला ग्रामपचायतीसमोर उभे केले. चोराने गुन्हा कवूल केला. *आणि पचायतीने चोरास काय शिक्षा दिली? यास तीन एकर* जमीन देऊन शेतकरी बनवा.

ओरिसांतील जास्तीत जास्त ग्रामदानी गांवें कोरापुट जिल्ह्यांत मिळाली आहेत. त्या गांवांत कोऑपरेटिव्ह दुकानें गांवकऱ्यांनी

सुरू केली आहेत. या दुकानाना ना धड खोली, ना दरवाजे; मग कुलुप कोठले ? दर तीन महिन्यांनी तपासणी व हिशेब केले असताना केव्हाहि माल चोरीस गेलेला आढळला नाही. अशा गोष्टी ऐकल्या म्हणजे ग्रामदान कलियुगातून सत्ययुग आणित आहे असे वाटायला लागते.

ग्रामदानी गावात लोकावरील जुन्या कर्जाचा बोजा सावकारास समजाऊन कमी करण्यात येत आहे त्यातील काही सावकारानी रकमा सोडल्या आहेत. उत्कलमधील मानपुर येथील ग्रामदानी गावात एका सावकाराने कर्ज माफ करून गहाण ठेवलेली जमीन परत केली. दुसऱ्या एका सर्वापुर गावच्या सावकारानी १२७६ रु. चे कर्ज सोडून दिलें आणि कर्जरोखे फाडून टाकले

एकीकडे सावकार कर्ज सोडित आहे, तर दुसरीकडे जमीनीच्या फेरवाटपाने अनेक नवीन दृश्यें दिसत आहेत अशा फेरवाटणीत काल जो पन्नास एकराचा मालक होता त्यास वाटपानतर दहा एकर जमीन मिळाली तसेच ज्याच्या जवळ कालपर्यंत एक इंच जमीन नव्हती त्यास बारा एकर जमीन ( कुटुंब मोठें असल्यामुळे ) मिळाली. दोघानीहि प्रमन्नपणें जगन्नाथजीचा प्रसाद स्वीकारला. दुसरीकडे गरीबास जास्त जमीन मिळण्याची शक्यता असताहि गरीबानी प्रमाणापेक्षा कमी जमीन घेतली व आपल्या गावातील श्रीमतास जास्त जमीन देऊन त्यावर प्रेमाचा वर्षाव केला.

ओरिसात ग्रामदानापूर्वी हजारो लोकाना नेसण्यास एकच धपडा होता. तो रात्री घुमावा व दिवसा नेसावा. आता सताई

करून असे लोक अधिक कपडे वापरूं लागले आहेत. चरख्याचा गुंजारव घरोंघर सुरू झाला आहे. नई तालीमच्या शाळा सुरू होत आहेत. यज नांवाचा एक परम्यासारखा भयानक रोग आटोक्यांत येत आहे. अनेक गावांतून त्याचें संपूर्ण उच्चारण झालें आहे. मंग-रोठमध्यें प्रेतकळेस आलेला चामड्याचा धंदा भरभराटीस लागला आहे. चराचे संडास चालू झाले आहेत. मंगरोठ गांवांतून भंगी काढून टाकला आहे. गांव स्वच्छ झाले आहे. सुतार, कुंभार गांवांत शिकवून तयार केले आहेत.

अशा रीतीने अनेकविध चमत्कार ग्रामदानी गांवांत होत आहेत.

देशांत चोहीकडे निराशेचें व बेजबाबदारपणाचें वाळवंट असतांना या छोट्या छोट्या हिरवळी कोठून आल्या? घोर कलियुगांत हे सत्ययुगाची आठवण करून देणारे देखावे कसे दृष्टीस पडले? हा ग्रामदानाचा परिणाम आहे. एका संताने सतत सहा वर्षे केलेल्या तपश्चर्येचा हा परिपाक आहे. भूदानयज्ञाच्या वेलीचें ग्रामदान हें फळ आहे. ग्रामदान ही क्रांति आहे. ही सामान्य सुधारणा नाही. म्हणून ग्रामदानाच्या क्रांतीकडे वळण्या-पूर्वी सुधारणा म्हणजे काय व क्रांति म्हणजे काय हें आपण पाहूं या.

प्रकरण दुसरें

# क्रांति आणि सुधारणा

भूदान, ग्रामदान व ग्रामराज्य हा क्रांतीचा कार्यक्रम आहे. सुधारणेचा नाही म्हणून क्रांति म्हणजे काय व सुधारणा किंवा विकास म्हणजे काय हे आपण समजून घेतले पाहिजे.

सुधारणा, विकास किंवा उत्क्रांति या सर्वांचा अर्थ एकच. सुधारणा हळूहळू होते. क्रांति लवकर होते क्रांतीला गतीची व तीव्रतेची अपेक्षा आहे भूदानयज्ञ ही क्रांति आहे कारण या चळवळीने लवकरात लवकर सत्तावनमध्ये समता आणावयाची आहे. पंचवीस पन्नास वर्षात हा कार्यक्रम पुरा करावयाचा नाही.

पण कोणतीहि लवकर होणारी गोष्ट म्हणजे क्रांति नव्हे. आपण बैलगाडीपेक्षा विमानाने चटकन् जातो म्हणून विमानाने जाणे काही क्रांति नव्हे क्रांतीत लोकांची समजूत, धारणा, कल्पना वा मूल्ये बदलतात. पूर्वी व आजहि समाजात मालक व मजूरसंबंध राहणार असे आपण मानून चाललो आहोत मालकाने व मजूराने चांगले वागावे हें झाले म्हणजे आजचे बहुतेक लोक खुष होतील. ही मालकमजूरसंबंधात सुधारणा झाली. पण क्रांतिकारी विचारतो की एकाने दुसऱ्यास मजूर का ठेवावें, व स्वतः मालक का बनावे ? म्हणजे तो जुन्या मालकमजूरसंबंधाच्या मूळावरच घाव घालतो. मजूरमालकसंबंध सुधारणे ही सुधारणा झाली. पण मालकमजूरसंबंधच नष्ट करणे ही क्रांति झाली.

आपण दुसरें उदाहरण घेऊं. आज ठिकठिकाणीं भंगी संप करतात. पगारवाढ, सुट्या, चांगलीं औजारें आदि त्यांच्या मागण्या आहेत. हा सर्व सुधारणेचा कार्यक्रम आहे. पण प्रत्येकाने आपापलें सफाईचें काम करावें व समाजांत कुणीहि भंगी नसावा हा क्रांतीचा कार्यक्रम आहे. भंगीच नको म्हणणारा मूळ कल्पनेलाच खतम करतो. त्याऐवजी नवीन कल्पना दाखल करतो. सर्वांनीच सफाई करावी. सर्वांनीच भूमातेची सेवा करावी. म्हणजे जीवनांतील मूल्येंच बदलतात.

मूल्यपरिवर्तन होण्याकरिता लोकांची मनें बदलावी लागतात, कारण त्यांच्या मनांत घर करून बसलेल्या जुन्या बुरसटलेल्या रूढी, कल्पना, समज आदि काढून त्याऐवजी नवीन काळास योग्य श्रद्धा मान्यतांची स्थापना करावयाची असते. सुधारणेमुळेहि माणसाच्या मनांत फरक होतो. पण तो फरक इतका मूलगामी नसतो. म्हणून कोणतीहि क्रांति आगोदर माणसाच्या मनांत होते. नंतर तिचें प्रतिबिंब बाहेरच्या समाजरचनेवर उमटतें.

मूल्य बदलल्यामुळे समाजाची जुनी रचना बदलते व नवी निर्माण होते. समाज जसाचा तसाच राहिला, थोडासा फरक पडला, जखमेवर थोडीशी मलमपट्टी झाली तर तो विकासाचा कार्यक्रम झाला. उदाहरणार्थ आजची पंचवर्षीय योजना घ्या. शेतींतील मजुरांना कमीत कमी मजूरी किती असावी हें ठरविलें पाहिजे असें या योजनेंत म्हटलें आहे. म्हणून मजुराला यामुळे थोडें सौख्य लाभेल. कांहीं पगारवाढ होईल. पण यामुळे मजूर

मजूरच राहील व मालक मालकच. भूदानयज्ञांतून जमीनीची-मालकी सपल्याने कुणीहि कुणावर मालकी गाजविणार नाही-ही क्रांति आहे.

एक वेळ समाजाच्या रचनेत क्रांति झाली की कायदा, राजनीति, तत्त्वज्ञान, धर्म आदीवर क्रांतीचा योग्य परिणाम होऊन सर्वांतच योग्य फेरफार होतात. जमीनीची मालकी मिटली तर मग सपत्तीचा तरी कोण मालक राहणार ? धर्मातील दास्य-भक्तिऐवजी सख्यभक्ति अधिक चागली वाटू लागेल मालकी-हक्कावर आधारलेले सारे कायदे बदलतील अशा रीतीने क्रांति जीवनाच्या एका विभागात सुरू होते, पण सपूर्ण जीवन व्यापून टाकते सुधारणेचे असे नाही. सुधारणा त्या विषयापुरती होते. तेथेंच तिचा परिणाम समाप्त होतो.

क्रांति झाल्यावर सुधारणा झपाट्याने होतात. पण क्रांति जोपर्यंत झालेली नसते तोपर्यंत सुधारणाहि फारशा पुढे जात नाहीत. जोपर्यंत समाजात जमीन व पैसा वाटण्याची क्रांति होत नाही, तोपर्यंत शाळा, रस्ते, दवाखाने, शेतीसुधारणा आदि विकासाचे कार्यक्रम फार पुढे जाणार नाहीत. प्रत्येक गोष्टीकरिता पैसा नाही, लोकाची मनें तयार नाहीत, कोणीहि जबाबदारीने काम करीत नाही हेंच कारण पुढे येईल यामुळे सर्व प्रगति खुटेल. पण एक वेळ का लोकाची मनें बदलली व आर्थिक क्रांति झाली तर त्यामळे शेतीसुधारणा, शाळा, दवाखाने आदि यामें झरझर होतील. कारण सर्व लोक मन लावून काम करतील. त्याना काम सरकारचें

वा परक्याचें न वाटतां आपलें वाटेल. म्हणून क्रांति झाल्यावर सुधारणांचा वेग अनेकपट होतो. पुन्हा कांही काळानें समाजरचना जुनी होते. त्यामुळे सुधारणेचा वेग मंदावतो. म्हणून ती रचना पुन्हा बदलावी लागते. म्हणजे क्रांति करावी लागते. मग सुधारणा पुन्हा भरधाव चालू लागतात.

क्रांति म्हणजे लोकांच्या विचारांत समूळ बदल. हा शुद्ध साधनानेच होऊं शकतो. जबरदस्तीने बाह्य रचना बदलते. पण विचार लादले जाऊं शकत नाहीत. जबरदस्तीने क्रांति होते ही भ्रांति अनेकांना झालेली आहे. त्यामुळे अशा जबरदस्तीविरुद्ध बंड होतें. त्यास प्रतिक्रांति म्हणतात. क्रांतीचा अर्थ समूळ बदल आहे. मग जुन्या जमान्यांत क्रांति करणाऱ्यांनी चुकीनें जबरदस्तीचीं साधनें वापरलीं म्हणून आपण त्यांत बदल करावयास नको काय ?· सुधारणेंतहि शुद्ध साधनेंच असतात.

आज आपल्या देशांत काय चाललें आहे ? आज आपल्या देशांत पंचवर्षीय योजना चालू आहे. कांही विधायक कार्यकर्ते एकेकटे व संस्थांतून खादी, नई तालीम, ग्रामसेवा आदि सेवेचीं कामें करीत आहेत. सरकारतर्फे रस्ते, कालवे, धरणें, विजेचें उत्पादन, कारखानें, तकावीवांटप, शाळा, दवाखाने इत्यादि अनेक सुधारणेचीं व विकासाचीं कामें सुरू आहेत. किसानसभा व मजुरांचें युनियन्स पगारवाढ, सुट्या आदि मागून मजूरांचें जीवन सुखी व्हावें असा प्रयत्न करीत आहेत. पण या सर्व सुधारणांनी आजची भांडवलशाही समाजरचना बदलणार नाही. श्रीमंत

श्रीमंतच राहतील. गरीबांची गरीबी किंचित् दूर होईल, कदाचित् एवढेहि होणार नाही. कारण क्रांतिपूर्वीच्या सुधारणानी कधी कधी मूळ रोग अधिकच वाढतो. आजच्या समाजात तकावी वाटली किंवा सुधारणा लागू केल्या तरी त्याचा फायदा हमखास वरच्या वर्गानाच मिळतो. पैशापाशी पैसा जातो. ज्याच्याजवळ काही नाही त्यास या सुधारणाचा फायदा मिळत नाही. ज्याच्याजवळ शेत नाही त्यास आर्थिक मदत मिळत नाही. जो गरीब आहे तो शाळेचा लाभ कसा घेणार? त्यास तर आपल्या मुलास गुरांमागे पाठवावे लागतें. व मुलीकडे घरातील लहान मुले सांभाळण्याचें काम येते.

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेत पाच हजार जनसंख्येखालच्या गावावर जी रक्कम खर्च होणार आहे तिच्या पाचपट रक्कम पांच हजार लोकसंख्येवरील कमब्यावर व शहरांवर खर्च होणार आहे. कांग्रेसचे मंत्री श्री. श्रीमन्नारायणजी म्हणतात, "सामुदायिक विकास योजना व विस्तार योजना सर्वात खालच्या वर्गाची आर्थिक स्थिति सुधारण्यात सफल झाल्या नाहीत." म्हणून हा अन्त्योदयाचा म्हणजे सर्वात खालच्या माणसाच्या उदयाचा कार्यक्रम नाही. आणि या योजनेची गति फार धीमी आहे. पाच वर्षांत देशांचे उत्पन्न शेंकडा पंचवीसनें वाढणार आहे. त्यापैकी अर्धे वाढत्या लोकसंख्येमुळे फस्त होणार. म्हणजे शेंकडा बारानें उत्पन्न वाढेल. यापैकी गरीबांच्या नशिबी किती येईल कोणास ठाऊक? त्याबाबतीत श्री. श्रीमन्नारायणजी म्हणतात त्याप्रमाणे या ९–१० वर्षांत धनी व गरीब यांच्या जीवनमानातील अंतर कमी न होता उलट

वाढतच चाललें आहे. म्हणून गरीबांची गरीबी मिटल्याशिवाय या सुधारणांचा ते फारसा लाभ घेऊं शकणार नाहीत. या छोटया मोठ्या सुधारणांनी एक दुःख मिटेल पण दुसरें निर्माण होईल. म्हणून दुःखनिवारणाचें काम क्रांतीचें काम नाही. या कामांत आपण पडलों तर आपण समाप्त होऊं. पण दुःखें संपणार नाहीत. म्हणून दुःखाचें मूळ शोधून त्यासच आपण कापूं. आजच्या दुःखाचें मूळ सदोष आर्थिक रचना आहे. म्हणून आपण शेती व पैसा वाटूं. व नवीन आर्थिक रचना बनवूं. एवढयानेच गरीब शेतकऱ्यांचें उत्पन्न तावडतोब दुप्पट होईल. भूमिमजूरांचें तर यापेक्षाहि अधिक वाढेल. शेती मिळाल्यामुळें त्यांचा कामाचा हुरूप वाढेल. व म्हणून पांच वर्षांत देशाचें उत्पन्न दीडपट दुप्पट होऊं शकेल. ग्रामदानी गांवांचें उत्पन्न एका वर्षांत दुप्पट तिप्पट झालेलें आपण पाहिलेंच. त्यांचें उत्पन्न वाढलें कीं मग शाळा, दवाखाने, तकावी आदि सुधारणांचा फायदा ते घेऊं शकतील. गांवें स्वतःच शाळा व दवाखाने चालवूं शकतील.

जी गोष्ट पंचवार्षिक योजनेची तीच गोष्ट सेवेच्या अन्य कामांची. ही सर्व कामें जीवापाड मेहनतीने अनेक सेवक करीत आहेत. यामुळें गरीबांस थोडी फार मदत मिळते. व थोडा बहुत आधार मिळतो. पण याने त्यांची गरीबी कायमची मिटत नाही. भांडवलशाही रचना बदलत नाही. तीस पसतीस वर्षांपासून खादीकाम चाललें आहे. दहा पंधरा वर्षांपासून नई तालीमचें काम अनेक गांवांत चाललें आहे. पन्नास साठ वर्षांपासून मजूरसंघटना आहेत. पण यांनी समाजरचनेंत काडीमात्र फरक पडला नाही. म्हणून

पचवार्षिक योजनेत, विधायक कार्यात व मजूरसघटनेत लोकाचे मन लागत नाही

नेहरूजी म्हणतात की पचवर्षीय योजनेने अन्नाचे उत्पादन पुरेसे वाढवू शकलो नाही व शेतकऱ्यात उत्साह निर्माण करू शकलो नाही तसेच विनोबाजी म्हणतात की मी तीस वर्षे विधायक कार्यात घालविली पण विधायक कार्य फारसे पुढे जाऊ शकले नाही कारण विधायक कार्यास भूमीचा-जमीन वाटणीचा-पाया नव्हता पायाशिवाय इमारत कशी बनणार? ओरिसातील काही भागात शेतकरी धान्याचे बी पेरण्यापूर्वी प्रथम शेती जाळतो नतर नवीन पेरणी करतो त्यामुळे पीक चागले येते त्याच-प्रमाणे जुनी समाजरचना बदलल्याशिवाय नवीन काम कसे होणार? आज समाज पैशाच्या व सग्रहाच्या पायावर उभा आहे त्यात बदल करून आपणास असग्रहाच्या व श्रमनिष्ठेच्या नवीन नैतिक मूल्यावर समाज उभा करावयाचा आहे आज व्यभिचाराविरुद्ध कायदा असो वा नसो व्यभिचार गैर मानला जातो तसेच सग्रह गैर मानला गेला पाहिजे

ग्रामदान हे जुनी समाजरचना बदलून नवीन समाजरचना करण्याचे काम आहे ग्रामदानाच्या रूपाने मानवी मन बदलण्याची किल्ली सापडली आहे ग्रामदानाने आजचे सर्व प्रश्न सुटतील. मानवाच्या मनाला लोभाची, बेजबाबदारपणाची, बेदरकारपणाची लागलेली कुलुपे उघडतील ही क्राति सत्तावीसशे गावात एकदम कशी घडून आली? भूदानाच्या बीजातून ग्रामदानाचा वृक्ष कसा निर्माण झाला? हे पाहण्याकरिता आपणास थोडे मागे वळून पाहिले पाहिजे

प्रकरण तीसरें

# थोडें मागे

भारतात समता व समृद्धि आणण्याकरिता व भारताचे सर्व खळमळ धुवून काढण्याकरिता सत विनोबाजीनी १९५१ मध्ये भूदानयज्ञ सुरू केला. भूदानयज्ञाचे काम करण्याकरिता सर्व प्रातात त्यानी भूदानसमित्या स्थापन केल्या या पाच वर्षात देशातील हजारो कार्यकर्त्यांना यज्ञाचे प्रशिक्षण मिळाले. लाखो गावात सदेश गेला. कोटयवधि जनतेस भूदानयज्ञाची ठळक तत्त्वे माहित झाली वचाळीस लाख एकर जमीन मिळाली दोन हजाराहून अधिक गावे ग्रामदानात मिळाली. सपत्तिदान, बुद्धिदान, श्रमदान व जीवनदान सुरू झाले. हजार लोकानी पूर्ण वेळ देऊन काम केले भूदानआन्दोलन चालविण्याकरिता व गरजू कार्यकर्त्यांच्या निर्वाहार्थ काही मदत गाधीनिधीतून मिळाली. उरलेली मदत जनतेनें केली शेकडो कार्यकर्त्यानी निर्वेतन काम केले. कन्याकुमारीपासून हिमालयापर्यंत व द्वारकेपासून दिब्रुगढपर्यंत भूदानयज्ञाच्या घोषणानी भारतीय आकाश दुमदुमून गेले. पण विनोबाजीचे ध्येय हिमालयाएवढे ऊच व सागराएवढें खोल आहे. म्हणून त्यानी या वर्षी कन्याकुमारीत महासागरासमोर प्रतिज्ञा केली की ग्रामराज्य हे माझें लक्ष्य आहे व ते साध्य होईपर्यंत मी असाच फिरत राहीन. या ग्रामराज्याच्या ध्येयाकरिता सत्तावनमध्ये गाव अन् गाव ग्रामदान झाले पाहिजे.

मग लोक विचारतात की ही एवढी मोठी उडी एका वर्षात कशी मारता येईल? सहा वर्षात दोन अडीच हजार ग्रामदाने व सत्तावनमध्ये एका वर्षात साडेपाच लाख ग्रामदाने? लोक म्हणतात की हे कोणते गणित आहे?

हें क्रांतीचे गणित आहे मृगात आपण सरकी पेरतो. दसऱ्याच्या सुमारास पऱ्हाटीला आरंभी एक येथे तर एक तेथे अशी आठदहा बोंडे दिसतात नंतर पंधरा दिवसात चोहीकडे पांढरे होते. जें काम तीन साडेतीन महिन्यात इवलेसेंहि दिसले नाही ते तीन महिन्यानंतर थोडेसे दिसू लागले व नंतर आठपंधरा दिवस जात नाहीत तोंच सर्वत्र प्रगट झाले तद्वतच आतापर्यंत भूमिक्रांतीची तयारी झाली सर्वांना आत्मविश्वास आला म्हणून सर्वांनी जोर लावला तर सत्तावनमध्ये ही क्रांति सफल होऊन आर्थिक रचना बदलू शकते हें कोणाच्याहि बुद्धीस पटू शकेल

आजची आर्थिक रचना कशी आहे? तिचा पाया चढाओढ आहे बळी तो कान पिळी हा न्याय आर्थिक क्षेत्रात लागू होतो. समाजात श्रीमंत, मध्यमवर्ग व गरीब असे वर्ग बनतात मालक मजूर असे तट पडतात आपसात संघर्ष होतो समजा रामाजवळ दहा शेर शक्ति आहे व गोविन्दाजवळ आठ शेर दोघात संघर्ष झाला तर रामा जिंकेल पण सारा समाज हरेल कारण संघर्षामुळे सोळा शेर शक्ति व्यर्थ्यात गेली व दोन शेर शक्ति समाजास मिळाली रामा व गोविन्दा सहयोग झाला तर सहयोगाने अठरा शेर शक्ति समाजास मिळेल संघर्षातून द्वेष, मत्सर व कलह

वाढतात त्याची शेवटची मजल जागतिक युद्धापर्यंत जाते. यांत कुणाचेच भले नाही हे सर्वांना समजते परतु या समाजरचनेच्या भोवऱ्यात सापडल्यामुळे कोणासहि यातून बाहेर पडण्याचा मार्ग सूचत नाही. म्हणून आपणास चढाओढ नको. आपणास सहकाराच्या पायावर समाज बनवावयाचा आहे

म्हणून आजच्या समाजाची रचना बदलली पाहिजे. आज समाजात रोग वाढले तर डॉक्टरचा फायदा होतो भाडणे वाढली तर वकिलाचा फायदा जास्त पाऊस येऊन तण वाढले तर मजुराचा फायदा व मालकाचे नुकसान. एकाचा फायदा तर दुसऱ्याचे नुकसान असे आज चालते परतु एका मानवाचे हित दुसऱ्या मानवाच्या हिताविरुद्ध असूच शकत नाही आजच्या चुकीच्या समाजरचनेने हितात विरोधाचा भास निर्माण झाला आहे म्हणून एकाच्या स्वार्थाची दुसऱ्याच्या स्वार्थाशी टक्कर होणार नाही, सर्वांचा उदय होईल असा समाज आपण स्थापन केला पाहिजे. अशा समाजास सर्वोदय समाज म्हणतात नुसत्या जमीनीच्या वाटपाने सर्व प्रश्न सुटत नाहीत हे कोण जाणत नाही ? पण आर्थिक समतेचा पाया असल्याशिवाय सर्वोदय समाजाची इमारत उभी होऊ शकणार नाही. याकरिता सर्वांतील कर्तव्यभावना जागवावी लागेल. प्रत्येकाच्या हृदयातील झोपलेल्या देवाला आळवावे लागेल आपल्याहून अधिक दु.खी माणसाकरिता प्रत्येकाने काही केले पाहिजे ही भावना समाजात निर्माण करावी लागेल आपल्या देशात सर्वात खालचा मनुष्य शेतमजूर. त्यास शेतकऱ्याने जमीन द्यावी, अन्यांनी

सपत्तिदान देऊन बैल, औजारे, बी आदि द्याव हा कार्यक्रम भूदान-यज्ञा द्वारा देशासमोर आला प्रत्यक्ष त्यागाचा, आचरणाचा कार्यक्रम देशास भूदानयज्ञामुळे मिळाला देशातील लाखो लोक त्या मार्गाने एक पाऊल चालले जे चालले नाहीत त्यानाहि हा कार्यक्रम आवडला

एक वेळ जनमानसात कार्यक्रम रुजू झाल्यावर आता मर्वोदय समाज स्थापण्याकरिता पुढची पावल झपझप उचलणे शक्य होईल आपल्या देशात खेडी जास्त म्हणून देशाची आर्थिक रचना ग्राम-प्रधान असावयास हवी लडनहून स्वराज्याचे पार्सल दिल्लीस आल व तेथेच अडकले आता ते गावोगाव गेले पाहिजे स्वरा-ज्याचे रुपातर ग्रामराज्यात झाले पाहिजे ग्रामराज्य स्थापन तेव्हाच होईल जेव्हा सर्वास तीव्रतेने ग्रामराज्याची आवश्यकता वाटेल म्हणून ग्रामराज्याची आवश्यकता काय आहे इकडे आता आपण वळू

---

प्रकरण चवथें

# ग्रामराज्याची आवश्यकता

खेडी आपल्या पायावर उभी झाल्याशिवाय सुखी बनूं शकणार नाहीत. पराधीन माणसाला स्वप्नांतहि सुख मिळत नाही असें संत तुलसीदासजीनी म्हटलें आहे. त्याकरिता आपण भारताचें स्वराज्य मिळविलें.

जो न्याय भारतास लागू तोच भारतांतील खेड्यांस लागू. स्वराज्य येण्यास दहा वर्षे झाली. पण खेड्यांची गुलामी मिटली नाही. प्रत्येक गोष्टीकरिता खेडीं शहरांवर अवलंबून आहेत, गुलाम आहेत. यामुळे खेडी चोंहीकडून लुटलीं जात आहेत. जो खेड्यांत येतो तो लुटण्याकरिताच येतो. त्यामुळे खेड्यांत लक्ष्मी राहिली नाही. खेडुत शहरांत बनलेला माल खरेदी करतात. त्यामुळे ग्रामोद्योग राहिले नाहीत. बेकारी व अर्धबेकारी प्रचंड प्रमाणांत खेड्यांत आहे. एका सर्वसाधारण खेड्याचा हिशेब केला. त्यांत असें दिसलें की आपण जितकें कमावतों त्यापेक्षा या लुटीपायीं, अज्ञानापायी व व्यसनांपायीं जास्तच गमावतों. हिंदुस्थानत्रें आजचें दरकुटुंबाचें सरासरी वार्षिक उत्पन्न पंधराशे रुपये आहे. पण त्यांपैकी खेड्यांतील शेतकऱ्याच्या वांट्यास सातशें व मजुराच्या वांट्यास पांचशेंच रुपये येतात. नुसत्या न्यायपूर्ण वांटपानेच प्रत्येक खेडुताचें उत्पन्न दुप्पट तिप्पट होईल.

आपल्या खेड्यात शेतकरी बहुसंख्य आहेत. पण ते तरी एकाच वर्गाचे आहेत काय? खेड्यातील शेतकऱ्याचे चार वर्ग पडतात पहिला मोठ्या शेतकऱ्याचा वर्ग याच्याजवळ शेपांचशें एकराहून अधिक शेती असते. शेतीकरिता ट्रॅक्टर असतो. म्हणून यास आपण ट्रॅक्टरवाले म्हणू याचा पक्का बगला गावांत असतो. शहरातहि बगला असतो. हे मुख्यत. आजकाल शहरातच राहतात. घरात चकाकणाऱ्या खुर्च्या व टेबले असतात. आपल्या मुलाबाळाना शिक्षणाकरिता दूर पाठवितात. हे हाताने काम करीत नाहीत याची सावकारी चालते सरकारी अधिकारी, असेंब्लीमेंबर व मंत्री याच्याच येथे उतरतात त्यामुळे गावकऱ्यावर याची जरब असते. पचवर्षीय योजनेचा बराच मोठा हिस्सा याच्या पदरात पडतो. याची सख्या शभरातून दोन असेल

दुसरा वर्ग पचवीस ते शभर एकराच्या मालकाचा. घरी सायकल असते. म्हणून याम आपण सायकलवाले म्हणू. पक्के घर आहे. घरात खुर्च्या आहेत. हे आपल्या मुलाबाळाम शिक्षणाकरिता जवळच्या कॉलेजात पाठवितात. खेड्यात याचे एखादे दुकान असते. सावकारीहि करतात. छोटीमोठी यत्रे आणून गावात बेकारी वाढवितात. हे आपल्या शेतात हाताने काम करीत नाहीत. हे खाऊनपिऊन सुखी असतात. याची सख्या शभरात आठ दहा असते.

तिसरा वर्ग आहे पाच एकरापासून पचवीस एकरवाल्याचा. यांच्याजवळ बैलगाडी व बैलजोडी असते म्हणून याना बैलवाले

म्हणूं. घर कच्चें व छोटें, बाजेशिवाय दुसरें फर्निचर नाही. एखाद्या मुलास हे सातवीपर्यंत शिकवूं शकतात. व मग मास्तर किंवा पटवारी होण्याकरिता तो वणवण भटकतो. हे कामाच्या वेळेस मजुरांची मदत घेतात. दुसऱ्यांकडेहि खाली वेळेस मजुरीला जातात. हे गळ्यापर्यंत कर्जात नेहमी बुडालेले असतात. यांचें जीवन म्हणजे अश्रूंची करुण कहाणी आहे. यांची संख्या शंभरांत पन्नास असते.

चौथा व सर्वात खालचा वर्ग म्हणजे ज्यांच्याजवळ जमीन नाही किंवा पांच एकरापर्यंत जमीन असणाऱ्यांचा आहे. यांच्या-जवळ एखादी बकरी असते. म्हणून याना बकरीवाले म्हणूं. यांच्याजवळ कधी कधी घरासहि जागा नसते. घर म्हणजे एक चंद्रमौळी झोपडी. घरात भांडीकुंडीहि पुरेशी नसतात, मग फर्निचर कोठलें? ना याना भरपोट जेवण, ना यांच्या मुलांबाळांस शिक्षण. उद्या काम मिळेलच याची खात्री नाही. म्हणून हा सदैव चिंतेंत व कर्जात बुडालेला असतो. यांचें जीवन हा आपल्या देशाच्या सर्वात मोठा कलंक आहे. यांची संख्या शंभरांत चाळीस येईल.

वरील चार वर्ग ज्वारी व कापसाचें क्षेत्र लक्षांत घेऊन केलेले आहेत. धानाच्या क्षेत्रांत पहिला वर्ग तीस एकरांवरचा, दुसरा वर्ग दहा ते तीस एकरांपर्यंतचा, तिसरा वर्ग तीन ते पंधरा एकरांपर्यंतचा, व चौथा वर्ग तीन एकरांखालचा राहील. धानाच्या क्षेत्रांत तिसऱ्या वर्गाची संख्या शंभरांतून पासष्ठ सत्तर राहील. व चौथ्या वर्गाची संख्या पंधरा वीस राहील.

सर्व वर्गाचे शेतकरी बाजाराकरिता माल पैदा करतात व त्यामुळे व्यापाऱ्यास शरण जातात प्रत्येक वरचा वर्ग आपल्यापेक्षा खालच्या वर्गास लुटण्याची धडपड करतो सर्वांचा भार भूमीहीन मजुरावर पडतो मजूर मन लावून काम करीत नाहीत ही सर्व शेतकऱ्याची तक्रार आहे मालक पूर्वीसारखे राहिले नाहीत ही मजुराची तक्रार आहे लहान शेतकरी व भूमिहीन मजूर हा राष्ट्राचा पाया आहे पण हा पायाच कमजोर आहे

आज खेड्यातील धन दौलत पाच मार्गांनी शहराकडे जात आहे मोटेला मोठमोठी पाच छिद्रे असावी म्हणजे मोट भरून येणें अशक्य होते, त्या छिद्रावाटे सारे पाणी निघून जातें तशी आज गावातील लक्ष्मी शहराकडे निघून जात आहे ही पाच छिद्रें म्हणजे बाजार, सावकार सरकार, व्यसन व रीतिरिवाज

बाजार—आपण आपल्या वस्तू विकतो व शहरातील माल खरेदी करतो खेड्यात गरजेचा माल बनवत नाही खरेदी करताना व विकताना दोन्ही वेळेस व्यापारी भाव ठरवतो म्हणून खेडुताचा माल स्वस्तात स्वस्त घेतला जातो व शहराचा माल महागात महाग त्याना विकला जातो

सावकार—लग्न, नापिकी, बैल आदींकरिता शेतकरी सावकाराला शरण जातो मग व्याज कधीहि संपत नाही व मुद्दल कधी फिटत नाही अशा स्थितीत ठेवलेली शेती सावकाराकडे जाण्यास कितीसा वेळ लागेल?

**सरकार**—शाळा, दवाखाने, रस्ते, शेतीसुधारणा, उद्योग सर्व काही सरकारने करावे अशी लोकाची अपेक्षा असल्यामुळे भरमसाट कर लादले जातात पुन्हा सरकार शेतसारा वा अन्य कर पैशात घेते धान्यात घेत नाही त्यामुळे शेतकरी बाजाराची कास धरतो व पडलेल्या भावात माल विकतो सरकारच्या करापकी पुष्कळसा पैसा फौजेत, कर वसूलीत, व्यवस्थेत व शहराच्या सुखसोयीत आटून जातो जो थोडासा खेड्यात येतो तोहि वरच्या शेतकऱ्यास मिळतो नतर उरले तर बैलवाल्याचा नबर लागेल अशा अवस्थेत बकरीवाल्यास काय मिळणार ? जणू काही तो जन्मासच आला नाही

**व्यसने**—अशा रीतीने चोहीकडून लूट होत असल्यामुळे हताश झालेला खेडुत जुवा, दारू, सट्टा आदि व्यसनाच्या तावडीत सापडतो अन्य पुरुषार्थ शिल्लक राहिला नसल्यामुळे खेड्यात थोड्या निमित्तानेहि भाडणतटे होतात, तट पडतात व पार्टर्या होतात आजच्या इलेक्शनच्या पद्धतीनेहि तट पडतात भाडणतटे कोर्टात जातात वकीलास मग खेडुत शरण जातो प्रत्येकजण अलग अलग शहराच्या माणसाकडे न्याय मागण्यास जातो या सर्व कारणामुळे खेड्यातील बराचसा पैसा शहराकडे जातो

**रीतिरिवाज**—अशा नीरस व भकास जीवनात लग्नासारखे प्रसग हिरवळीचे वाटतात खेडुत अशा वेळेस भरमसाट खर्च करतो लग्न, हुडा, शालमुदी, तेरवी आदि प्रसगाकरिता कर्ज काढावे लागते पुन्हा सावकारास शरण जावे लागते या रीतिरिवाजामुळे पुष्कळ पैसा शहराकडे जातो

याशिवाय रोग झाल्यास आपण शहरातील डॉक्टराकडे धाव घेतो आपल्या धंद्याचे उत्तम धंदेशिक्षण न देता शहरातील ऐतखाऊ व आळशी बनविणारे शिक्षण आपल्या मुलाबाळास देण्यास आपण धन्यता मानतो अशा शिक्षणाने व शहराच्या वातावरणाने मुलगा बिघडतो मग मुलगा बिघडला म्हणून खेडुत टाहो फोडतात. यास नोकरी न मिळाल्यामुळे दूषण देतात नोकरी मिळाली तरीहि खेड्यातील बुद्धि शहरात गेलीच, हा शिक्षित मुलगा खूप पैसे कमावतो म्हणजे पुन्हा खेड्याना राजरोसपणे लुटतो अशा रीतीने शिक्षण, औषधपाणी आदीच्या निमित्ताने अगणित पैसा शहराकडे जातो मनोरंजनाची सोय खेड्यात राहिलेली नसल्याने सिनेमाच्या निमित्ताने पैसा शहरात जातो मजूर मन लावून काम करीत नसल्याने व छोटया शेतकऱ्यास कामात हुरूप नसल्याने पुष्कळच उत्पन्न कमी होते

वर लिहिलेले पान मार्ग एकमेकास मदत करतात जसे, शेतसारा द्यावा लागल्याने बाजाराम शरण जावे लागले, लग्नाकरिता सावकारास शरण जावे लागते आदि सर्वांचा परिणाम एकच, पुन्हा व्यापारी, सावकार, वकील, सरकार यांच्याशी खेडुत एकेकटा व्यवहार करतो खेड्याची एकजूट करून व्यवहार करीत नाही त्यामुळे त्याग योग्य तें मिळत नाही ही सर्व छिद्रें बंद करण्याकरिता एकच उपाय आहे ग्रामराज्याची उभारणी

आज गावात समाजच नाही मग समाजरचनेस वसा होणार असे मध्यवर्ती मंत्री श्री डे म्हणाले समाज म्हणजे एकत्र

चालणाऱ्याचा समुदाय  आज ट्रॅक्टरवाले सायकलवाले, बैलवाले व बकरीवाले आपसात भाडत आहेत  गावातील सज्जन निष्क्रिय झालेले आहेत  गावात कोणी कोणावर अन्याय करो, 'मला काय त्याचे' ही सज्जनाची वृत्ति आहे  त्यामुळे प्रत्येक गावातील बदमाशाचे व गुडाचे फावते  अशा परिस्थितीत सामान्य माणुस या गुडानी पछाडलेल्या गावात राहू इच्छित नाही  तो जवळच्या शहराकडे धाव घेतो  अशा पलायनाने गाव आणखीच बिघडते  अशा वर्गभेद व जातिभेदानी पछाडलेल्या, रात्रदिवस उद्याच्या चितेने काळवडलेल्या व गुडानी ग्रासलेल्या गावाचे कोण बाहेरचा माणूस शोषण करणार नाही ?

खेड्यात शिरताक्षणी नाकास फडके लावावे लागते  इतकी घाण खेड्यात असते  खेड्यात ना औषधपाण्याची सोय ना योग्य शिक्षणाची प्रत्येक खेड्यात शाळा नाही  जेथे शाळा आहे तेथे जे शिक्षण दिले जाते त्यास शिक्षण म्हणावे की नाही हा प्रश्न मनात येतो  खेड्यात मनोरजनाची सोय नाही  खेड्यातील घरात ना हवा, ना प्रकाश, ना पुरेसे पोषक अन्न, ना पुरेसे वस्त्र  अनेक खेड्यात, विशेषत आदिवासी भागात, पिण्याचे पाणीहि दुर्मिळ मैलभरावरून बायाना पाणी आणावे लागते

अशा या खेड्यात आज जीवनाची कोणतीहि सोय नाही म्हणून खेडुताचे डोळे शहराकडे लागलेले असतात  कापड, साखर, तेल, उद्योग, शिक्षण, न्याय, रक्षण, औषधे, कर्ज आदि सर्व गोष्टीकरिता आज खेडुतास शहराच्या तोंडाकडे पहावे लागते.

खेड्यात ना सुख, ना समाधान शहरात मास्तराची, कारकुनाची वा चपराशाची एखादी नोकरी मिळवावी, शहरात एखादे घर भाड्याने घेऊन मुलाबाळास शिक्षण द्यावे, सिनेमा पहावा, हॉटेलात जावे हे आजच्या खेडुताचे स्वप्न आपल्या खेड्यातील जीवनात त्यास आज राम वाटत नाही पदोपदी त्याचा अपमान होतो बुद्धिमान, श्रीमंत, अधिकारी सर्वच त्यास तुच्छ मानतात मग त्यास स्वत लाहि तसेच वाटावयास लागते आपल्या खेड्याचा अभिमान शिल्लक उरला नाही शहरातील सरकारी कारकून, तहसीलदार व खेड्यातील पटवारी, वनरक्षक आदि नोकर काम लवकर करीत नाहीत पटवाऱ्याच्या, कोर्टाचा व साहेबाच्या घरच्या खेटा घालताना कोण यातायात पण थोडीशी मूठ ढिली केली की काम लवकर होते हा निरयाचा अनुभव खेड्याच्या शेतातील विहिरीकरिता वा गावातील पिण्याच्या पाण्याच्या विहिरीकरिता सिमेंट मिळत नाही पण शहरातील बंगल्याकरिता वा सिनेमा थिएटर करिता वाटेल तेवढे सिमेंट मिळताना तो पाहतो म्हणून गावकरी निराश होतो, चिडतो अशा परिस्थितीत इलेक्शनच्या वेळी ' तुम्ही राजे आहात, आम्ही तुमचे सेवक आहोत ' अशी भाषणे त्यास ऐकविण्यात येतात त्यामुळे त्याच्या जुन्या जखमावर मीठ चोळल्यासारखे होते शहरातील माणसाप्रमाणे खेड्यातील माणसास एक मत मिळाले पण तेवढ्याने तो राजा झाला नाही आज आपल्या देशात लोकशाहीच्या नावाखाली श्रीमंताचे व शिक्षिताचे राज्य चालू आहे म्हणून या अपमानावर, शासनातील दिरंगाईवर, लुटीवर व दारिद्र्यावर उपाय एकच खेडुताचा ग्रामाभिमान जागृत झाला पाहिजे खेडुतानी आपापले गाव ग्रामराज्य बनविले पाहिजे-

तर मग ग्रामराज्य हें आमचें ध्येय ठरलें. त्याकरिता एकजूट करून आपणांस आपलें राज्य स्थापन करावयाचें आहे ही भावना गांवांत निर्माण व्हावी लागेल. दुसऱ्यांवर वा सरकारवर अवलंबून न राहतां आपल्या पायांवर उभें राहणें हा ग्रामराज्याचा अर्थ आहे. वरच्या शासनघटकांच्या हातीं जितकी जास्त सत्ता खेडीं सोपवितील तितकीं तीं पराधीन बनतील. म्हणून ग्रामराज्यांत जास्तीत जास्त सत्ता गांवांतच राहील. एकजूट करण्याकरिता गांवांतील आजचे ह्याओढीवर आधारलेले वर्ग समाप्त करावे लागतील. आजची बेकी, वर्ग व स्वार्थ कायम ठेऊन ग्रामराज्य कधीहि स्थापन होणें शक्य नाही. म्हणून गांव एकजिनसी करून ग्रामसमाज बनवावें लागेल, त्याकरिता गांवांतील सर्व जमीन एक करून त्याची मालकी गांवाची म्हणजेच गांवसमाजाची करावी लागेल. यालाच ग्रामदान म्हणतात. ग्रामदान हा ग्रामराज्याचा पाया आहे. अशा रीतीनें आपण ग्रामदानापर्यंत येऊन पोहोंचतों. म्हणून ग्रामदान म्हणजे काय तें आता आपण पाहूं या.

---

प्रकरण पांचवें

# ग्रामदान

ग्रामदान शब्दाने लोक उगीचच घाबरतात लोकास वाटते की ग्रामदान म्हणजे आपले सर्वस्व कोणास तरी देऊन टाकणे पण ह्या ग्रामदानचा अर्थ नाही या जगात भगवताचें सर्व काही आहे सूर्य, चद्र, बुद्धि, शक्ति सर्व काही त्याचेच त्याची वस्तु त्याला अर्पण करणे ह्याचेच नाव ग्रामदान

आपापली जमीन, मेहनत, बुद्धि, पैसा सर्व काही गावातले लोक ग्रामदानात परमेश्वरास म्हणजे गावास अर्पण करतील व मग आपसात वाटून घेतील यात भिण्यासारखे काय आहे ? हे तर आपण कुटुबात दररोज करतो ग्रामदान म्हणजे आपले कुटुब मोठे बनविणे गावास कुटुबाची रीत लागू करणे भाडवलशाही सागते की श्रम मजूराचे आणि दौलत मालकाची ज्याचे श्रम त्याचीच दौलत हा समाजवादाचा सिद्धात आहे सर्वोदय असे मानतो की श्रम सामाजाचे पण सपत्ति ईश्वराची ग्रामदानानतर सर्व लोक आपापल्या शक्तिनुसार कामे करतील मग गरजेनुसार घेतील

किंवा असे पहा ना गावात आपण एकका किंवा गोपाळकाला करतो त्यावेळी ज्वारी, गहू, तादूळ आदि सर्व जमा करतो, मग सर्व मिळून गावाची पगत करतो श्रीमत जास्त देतो व गरीब कमी

देतो. पण सर्व पोटभर जेवतात. श्रीमंताने जास्त दिलें म्हणून तो जास्त जेवत नाही व गरीबाने कमी दिलें म्हणून त्यास आपण कमी जेवावयास देत नाही.

पुढे आपण पाहूं कीं ग्रामदानात उत्पादन तर वाढेलच. पण केवळ उत्पादनवाढ हें कांही ग्रामदानाचें रहस्य नाही. ग्रामदानाचें रहस्य हें कीं आपण सुखहि वांटून घेऊं व दुःखहि वांटून घेऊं. एकाचें सुखदुःख तें सर्वांचें होईल. त्यामुळे सुख वाढेल व दुःख घटेल. आज गांवांत थोडे लोक पोटभर जेवतात. पुष्कळसे अर्धपोटी राहतात. यापुढे खातील तर सर्व, उपाशी राहतील तर सर्व, म्हणून ग्रामदानाने गांवाएवढें कुटुंब बनेल.

गांवांत राहणाऱ्या जवळ जवळ सर्वांनी आपली जमीन, बुद्धि, श्रम दिले म्हणजे ग्रामदान झालें. बाहेर राहणाऱ्यांची गांवांत असलेली शेती त्यांच्याशी बोलणें करून मिळवितां येईल. तीच गोष्ट गांवांत राहणाऱ्या व गांवांत शेती असलेल्या एखाद्या दुसऱ्या शेतकऱ्याची. गांवांत राहणाऱ्या एखाद्याने अपवाद स्वरूप दान दिलें नाही म्हणून ग्रामदानाची घोषणा व त्यानंतरचें काम पुढे ढकलण्याची गरज नाही. ग्रामदानापासून अनेकविध लाभ आहेत. म्हणून विचारवंतांनी ह्या विचाराचें फार स्वागत केलें आहे. पंडित जवाहरलाल नेहरूपासून कम्युनिस्टांपर्यंत सर्वांना हा विचार मान्य आहे.

अर्थशास्त्रज्ञांना ग्रामदानाचा विचार फार आवडला आहे. कारण अर्थशास्त्रांतील ग्रामदान हा एक शुद्ध आधुनिकतम विचार आहे. ग्रामदानामुळे जमीनीच्या क्षेत्रांत असलेली विषमता जाईल.

लहान लहान तुकडे जोडले जातील  सर्वांवर जबाबदारी आल्यामुळे कालचे जमीनदार आज श्रम करायला लागतील व कालचे मजुर जे सागकामे होते ते मन लावून, बुद्धि वापरुन काम करतील. आतापर्यंत जुन्या मालकात व मजुरात चालणारा सघर्ष मिटेल. जमीनीच्या सुधाराची कामे सहकार्याने चालतील. गाव एक झाल्यामुळे त्याची शक्ति वाढेल  मग सरकारी मदतहि योग्य वेळी व योग्य प्रमाणात मिळेल  कारण अन्य गावात सरकारी मदतीचा फायदा फक्त काही थोडया लोकानाच मिळतो  पण ग्रामदानी गावात अशी गोष्ट घडली आहे की त्यामुळे सरकारी मदतीचा लाभ सर्वांनाच मिळणार आहे  सावकार व्यापारी अशा गावास लूटू शकत नाही  कारण आता व्यक्ति अलग अलग व्यवहार करणार नाहीत  परतु ग्रामसघटनेमार्फत सर्व व्यवहार चालतील  लहानशा गवताच्या काडीला कोणीहि मोडून तोडून टाकतो  पण तीच त्याचा दोर वळल्यास मग गजेंद्रालाहि बाधण्याचे सामर्थ्य तीत प्रगट होते  तसेच गावात ग्रामोद्योग सुरू होतील  गावातील लोक शेतकरी , विणकर, चाभार, तेली, कुभार, सुतार, लोहार हे एकमेकानी तयार केलेल्या वस्तु वापरतील  त्यामुळे ग्रामोद्योग वाढून गावाची सपत्ति गावात राहून गाव श्रीमत होईल  गावाची बेकारी मिटेल  गाव स्वावलबी होईल

धार्मिक पुरुप ग्रामदानाच्या विचाराने नाचतात  कारण त्यामुळे परस्पर प्रेम व सहकार वाढेल  म्हणून समाजाची सास्कृतिक व नैतिक पातळी उचावेल  याने गावकऱ्याची आध्यात्मिक

उन्नति होईल ते म्हणतात आजपर्यंत ' मी व माझे ' सोडून द्या असे धर्मपुस्तके व आम्ही सागत आलो पण आमचे कोणी ऐकले नाही. ग्रामदानाने माझी जमीन, माझी सपत्ति सपली व आपली जमीन आपली सपत्ति ही भावना आली धर्माचे काम झाले माझे घर व माझे शेत असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा हे ' माझे ' च मला आसक्तीच्या जाळ्यात अडकविते सर्व गाव आपले घर झाले म्हणजे मनुष्य व्यापक बनला त्याच्या छोटयाशा घराविषयीची आसक्ति सुटली.

पूर्वीचे सत सागत असत की घर सोडा अशाने आसक्ति सुटेल त्याचे अनुकरण फारच थोडयानी केले विनोबाजी उलट म्हणतात की तुम्ही तुमच्या कुटुबियावर प्रेम करता ही चागली गोष्ट आहे यास गावापर्यंत व्यापक करा एकदम कुणी प्रेम करू शकणार नाही म्हणून गावावर प्रेम करण्याचा हा मध्यमार्ग काढला म्हणून जमीन देशाच्या वा सरकारच्या मालकीची होणार नाही ती गावाच्या मालकीची होईल विनोबाजी अशा रीतीने वैराग्य शिकवित नसून गृहस्थधर्म शिकवित आहेत अनुराग शिकवित आहेत गावाचे एक कुटब बनविल्याने माझी शेती पाचपन्नास एकर न राहता पाचशे हजार एकर जमीन आपली होईल सबध गावाची शेती आपली होईल

अशा रीतीने आपण पाहिले की ग्रामदान धर्माच्या कसोटीवर उतरत धर्म म्हणतो की कोणा एकाला दु ख झाले तरी त्यात सर्वांनी वाटेकरी व्हावयाला पाहिजे कोणा एकटयालाच उपास काढू

देऊ नये. स्वत कमी खाऊन दुसऱ्यास खाऊ घालावे यालाच प्रेम म्हणतात, दया व करुणा म्हणतात हेच परमेश्वराचे रूप आहे. ग्रामदानाच्या कामात करुणा साक्षात् प्रकट होते श्रीमत लोक जमीन गावाच्या मालकीची करून गरिबाकरिता त्याग करतात, जसे घरात मुले असली की आईबाप प्रथम मुलाना खाऊ घालतात नतर उरल्यास स्वत खातात उरले नाही तरी अशा उपवासातहि महान् आनद असतो ही सधि ग्रामदानाने वरच्या वर्गास मिळते. मजूर श्रमदान करतात ते मेहनतीत श्रीमत आहेत प्रसगी आपले काम सोडून मेहनतीत जे गरीब आहेत अशा श्रीमताच्या शेतात ते काम करतील अशा रीतीने त्याग करण्याची महान् सधि ग्रामदानाने सर्वांस मिळेल म्हणून हा महान् धर्मविचार आहे

विज्ञान (सायन्स) ग्रामदानाबाबत काय म्हणते ? विज्ञानाने जग जवळ आले आहे जगाच्या एखाद्या कोपऱ्यातील लढाईचा परिणाम साऱ्या जगावर होतो म्हणून विज्ञानयुगात आपण आपली मने मोठी केली पाहिजेत हृदये विशाल केली पाहिजेत. सर्वांनी मिळून मिसळून काम केले पाहिजे. अन्यथा आपण नष्ट होऊन जाऊ आज कोणीहि दुसऱ्याच्या मदतीवाचून टिकू शकत नाही. जगाशी अशा रीतीने एकदम मिसळणे कठिण. त्यात कमजोर गावाची लूटच होणार. म्हणून प्रत्येकाने आपल गाव एव कुटुब मानावे एवढे मन मोठे बनवावे हें जड नाही. ग्रामदान झाल्यावर सर्वांचा स्वार्थ एक झाल्याने गावास एक कुटुब मानणे सोपे जाईल ग्रामदान याच विचाराची प्रेरणा देते. म्हणून ग्रामदान वैज्ञानिक आहे.

राजकीय दृष्ट्या ग्रामदान कसे आहे? राज्यशास्त्रज्ञ तर ग्रामदानावर बेहद खुष आहेत ते म्हणतात की प्रत्येक गाव एक (युनिट) बनले तर स्वराज्यात मोठी शक्ति पैदा होईल गावात शांति ठेवण्यात अडचण जाणार नाही गावाकरिता योजना बनविणे सोपे जाईल गावागावात राज्य झाले तर गावोगावी चागले राज्यकर्ते तयार होतील आज आपण राजकारणास अवास्तव महत्त्व दिले आहे सर्व काही केंद्रित सत्तेने करावे, कायद्याने व्हावे असे आपण म्हणतो त्यामुळे विश्वशांति आईक, बुल्गानिनसारख्या दोन चार लोकांच्या हातातील बाब झाली आहे सर्व महत्त्वाची कामे गाववाल्यानी कायद्याशिवाय मिळून मिसळून केल्याने राजकीय नेत्यांची सत्ता क्षीण होईल व त्यामुळे लढाई करणे दोन चार लोकांच्या हाती राहणार नाही जगातील जनतेच्या हाती येईल जनता शांतताप्रिय आहे म्हणून ग्रामदान ही उत्तम संरक्षण योजना आहे गावातील जनतेने एकमताने निवडणूक केल्यामुळे त्याचा प्रभाव वरच्या निवडणुकावरहि पडेल निवडणुकातील खोटयानाटया प्रकारास आळा बसेल गावात पक्ष न राहिल्याने वरचे पक्षहि क्षीण होतील अशा रीतीने राजकीय जीवन शुद्ध होईल विश्वशांति जवळ येईल

शिक्षणशास्त्रज्ञहि ग्रामदानावर मुग्ध आहेत कारण सर्व मुलाना उत्तम कर्मप्रधान शिक्षण मिळेल आज तर वरच्या वर्गाची मुलेच शिकतात वरच्या वर्गाच्या लोकात श्रम नाही. म्हणून त्यांच्या मुलाना कर्महीन शिक्षण मिळते खालच्या वर्गाची मुले शिक्षण घेऊ शकत नाहीत. म्हणून ती ज्ञानशून्य कर्म करतात ग्रामदानाने सर्व मुलाना कर्ममय शिक्षण मिळेल

समाजशास्त्रज्ञहि म्हणतात की ग्रामदान हा उत्तम विचार आहे. ग्रामदानाने जातिभेद मिटण्यात फार मदत मिळेल कोरापुट जिल्ह्यात ग्रामदानाने जातिभेद मिटत आहेत ग्रामदानाने सामाजिक सुधारणाची गाडी भरधाव चालेल

शांति व व्यवस्थावाले म्हणतात की ग्रामदानाने सर्वत्र व्यवस्था नांदेल आज गरीबास दिवसा काम मिळत नाही म्हणून तो रात्री काम ( चोरी ) करतो त्यास जेलमध्ये टाकतात तेथे जेवण, काम, झोप आदि सर्व त्यास व्यवस्थितपणे मिळते शिक्षा त्याला नसून घरातील बायकोस व मुलाबाळास झाली कारण घरचा कमावता गेला कोणता हा न्याय ! हीच व्यवस्था ? काय याने शांति स्थापन होईल ? मग पोलिस व फौज वाढणार. यातून भरमसाट कराचा बोजा आलाच म्हणून शांति व व्यवस्थेचा संपूर्ण प्रश्नच ग्रामदानाने सुटतो

अशा रीतीने ग्रामदानाचा विचार सर्वांना मान्य आहे यात सर्वांचे हित कसे आहे हे आपण पुढे पाहू

प्रकरण सहावें

# सर्वांचें हित

ग्रामदानात सर्वांचेच हित आहे आजच्या परिस्थितीत गावात मोठा शेतकरी, लहान शेतकरी, कारागिर, मजूर, कोणालाच पूर्ण समाधान नाही ग्रामदान हा सर्वांना अेक करणारा धर्मविचार समोर आला आहे त्याने सर्वांची हृदयें अेक होतील गावात प्रेम नांदेल ग्रामदानात सर्वांचे कसे भले आहे व ग्रामदानात प्रत्येकाने का भाग घेतला पाहिजे हे पाहू

**मोठा शेतकरी**—मोठ्या शेतकऱ्याचे ग्रामदानात कसे हित आहे ? आपल्या देशात समाजिक व आर्थिक विषमतेमुळे झगडे होत आहेत आर्थिक न्यायाच्या दृष्टीने पाहिल्यास सर्वांना योग्य वाटा देऊन आपल्या हिश्श्यावर येते तेवढीच जमीन प्रत्येकाने ठेवली पाहिजे त्याचप्रमाणे आपल्यापेक्षा जे गरीब आहेत त्याना मदत करणे हा प्रत्येकाचा धर्म आहे ह्या धर्माचें पालन करण्यानेच समाज टिकू शकेल

इग्रजानी राज्य सोडले संस्थानिकानी राज्यपद सोडले पण त्याची उपासमार झाली नाही उलट प्रेमाने ग्रामदानात जमीन दान दिल्यामुळे लोक मोठ्या शेतकऱ्याना आपल्या वडिलासारखे समजून त्याचा मानभाळ करतील त्याच्याविरुद्ध पसरलेला द्वेप एकदम नाहीमा होईल

आजची अनेक गावे मोठ्या शेतकऱ्यानीच वसविलेली आहेत. व ती त्याच्या नावानेच ओळखली जात आहेत गावच्या लोकाचा त्यानी मातापित्यासारखा साभाळ केला आहे ह्या ऐतिहासिक परपरेला हे साजेसेच होईल

ह्या मोठ्या शेतकऱ्यानी गावावरील सरकारी अधिकारी, व्यापारी, सावकार ह्याचे हल्ले परतावण्याचे काम केले पाहिजे. त्यानी आपल्या शक्तीचा, बुद्धीचा, सघटनकुशलतेचा लाभ गाववाल्याना करुन द्यावा तसेच शाळा, न्यायदान, दवाखाने, सहकारी सस्था, सरकारशी सबध, अनेक उद्योगधदे आदीद्वारा त्याना गावची हरप्रकारे सेवा करता येईल अशा त्यागी सेवामय जीवन जगणाऱ्या मोठ्या शेतकऱ्याना लोक काही उणे पडू देणार नाहीत.

आज मोठा शेतकरी कर्जाच्या बोजाखाली दबून गेला आहे. मुलामुलीचें लग्न, शिक्षण आदि बाबीबद्दल त्याला चिंता लागून राहिल्या आहेत ग्रामदानासाठी जमीन गाववाल्यानी दिल्यावर कर्जाचा बोजा साहजिकच सर्व गावावर जाईल गावात लग्न हा सार्वजनिक उत्सव मानला जाईल गावाला आपले कुटुब मानल्यानतर गावातील अन्य मुलाच्यासारखेच शिक्षण आपल्या मुलाना मिळेल

आज मोठ्या शेतकऱ्याजवळ शभर दोनशे एकर जमीन असते. या शेतीच्या उत्पन्नापैकी अर्धे उत्पन्न मजुरीच्या रुपाने मजुराना द्यावे लागते. मजूर मन लावून काम करीत नसल्यामुळे पैदावार कमी होते. मजुरावर देखरेख करण्याकरिता दिवाणजी, राजोटे,

आवारी, ठेवावे लागतात. उत्पन्नाचा एक हिस्सा त्यात जातो. मजूर उद्या कामास मिळतील की नाही ही एक नवीन चिंता निर्माण झाली आहे. सालदाराचे यदा काय साल निघेल हा प्रश्न आहेच. संग्रहामुळे चोरीची चिंता आहे सीलिंग, कुळकायदे, मृत्युकर आदीची भीति आहेच. अशा चिंतेत शेपाचशे एकराच्या शेतकऱ्याच्या हातात फक्त चवथा हिस्सा येतो तीन हिस्से जमीनीचा भार उगीच आपल्या डोक्यावर तो वाळगतो. श्रीमंतीमुळे सर्वांच्या निंदेस तो पात्र होतो. समाजात आज श्रीमंताची पूर्वीसारखी किंमत आहे असेहि नाही सर्व गरीबाच्या डोळ्यात तो सलतो. कोणत्याहि वस्तूचा उपयोग राजरोसपणे घेऊ शकत नाही कारण शेजारची भयंकर गरीबी पाहून त्याचे मन त्याला खात असते. रात्री सुखासमाधानाची झोप नाही शरीरश्रमापासून अलग झाल्याने त्याचे आरोग्यहि बिघडते. व त्यामुळे नेहमी डॉक्टरची बाटली घरात असतेच हे चिंतेचे व भीतीचे जीवन जगून आज श्रीमंत काय मिळवित आहेत ?

ग्रामदानात जर श्रीमंत सामील झाले तर त्याची सर्व चिंता व भीति दूर होईल. जमीन त्याना आजच्यापेक्षा कमी मिळेल, पण इतराइतकी कमी मिळणार नाही गावाच्या कुटुंबात सामील झाल्यावर इतरांपेक्षा जास्त जमीन त्याना गावकरी आनंदाने देतील. जमीन गणिताच्या समानतेने न वाटली जाता कुटुंबातल्याप्रमाणे वाटली जाईल. कुटुंबात दहा भाकरी असल्या व पाच माणसे असली तर प्रत्येकास दोन दोन भाकरी न मिळता ज्याच्या त्याच्या

आवश्यकतेनुसार मिळतात पण सर्व मिळून खातात कुटुंबातला हाच न्याय गावाला लागू होईल

अशी अनेक उदाहरणे प्रत्यक्षातहि घडली आहेत मगरोठ-मधील दिवाणसाहेबाना गावकऱ्यानी प्रेमाने त्याच्या हिस्स्यापेक्षा जास्त जमीन दिली व स्वत कमी ठेवली श्रीमत प्रेमाच्या मार्गाने एक पाऊल चालले तर गरीब दोन पावले चालतील हा ठिक-ठिकाणचा अनुभव आहे प्रेमे प्रेम वाढावे, द्वेषाने द्वेष अधिक वाढतो या उक्तीप्रमाणे श्रमिकहि श्रीमतास मिळालेल्या शेतीत श्रमदान करतील मनुष्य शेवटी जमीन जास्त का ठेवतो ? उद्याची चिंता राहू नये म्हणूनच ना ? माती तर कोणीच बरोबर नेत नाही. आज जास्त जमीनीने चिंता वाढली आहे श्रीमताची सर्व चिंता दूर होईल अति लठ्ठ माणसाप्रमाणे श्रीमताने अधिक जमीनीचें ओझे घेतले आहे लठ्ठ माणसाची चरबी कमी झाली तर त्याचे आरोग्य सुधारेल व आयुष्य वाढेल, तसं श्रीमताचे होईल. जे पैशाने कधीहि मिळणार नाही ती गोष्ट श्रीमतास प्रथमच मिळेल त्यास सर्वांचे प्रेम मिळेल

मध्यम शेतकरी—मध्यम शेतकऱ्यावर देशाचा फार भरवसा आहे तो देशाच्या पाठीचा कणा आहे साधेभोळें, मेहनती, सात्विक असें त्याचें जीवन आहे देशाची संस्कृति त्यानेच सांभाळली आहे पण आज त्याची फार दैना आहे त्याची अलग अलग तुकड्यांत शेती विखुरल्यामुळे त्यास वहिवाटीचा त्रास होतो, सावकाराचे पाश नेहमी भोवती पडून असतात व्यापारी परवडू

देत नाहीत. सरकारी अधिकाऱ्यांचें त्याच्याकडे लक्ष नाही. मजुराची साथ नाही महागडे शिक्षण, औषध व न्याय ह्यामुळे त्याचा जीव मेटाकुटीस आला आहे

ग्रामदानात त्याला एकत्र व्यवस्थित शेती मिळेल मालाच्या खरेदीविक्रीची सहकारी दुकानामार्फत व्यवस्था होईल. गावाची व सरकारची शक्ति त्याच्या पाठीशी उभी होईल त्याला सावकाराच्या घरात जमीन जाण्याचा, व्यापाऱ्याच्या लुटीचा धोका राहणार नाही. सुखी व नित्य विकासशील जीवन त्याला प्राप्त होईल

**लहान शेतकरी व मजूर**—आज चार पाच अेकरवाले शेतकरी व मजूर ह्यांचे जीवन सारखेच दीनवाणे आहे त्यांना उपासमार व अपमान नेहमी सहन करावे लागतात ग्रामदानात सर्व जमिनीचे वाटप झाल्यामुळे त्यांना कष्ट करून पोटभर खाण्याइतकी जमीन मिळेल आज त्याच्या मेहनतीची, घामाची कमाई दुसराच खाऊन जातो ग्रामदानी गावात त्याला इतरांसारखेच भरपूर मिळेल. तेव्हा ग्रामदानात त्याला काहीच गमवावे लागणार नाही उलट त्याच्या गरीबीच्या व गुलामगिरीच्या बेड्या तुटून तो इज्जतीने जगू लागेल मजूर म्हणेल की जमीन जशी गावाची तशी मी माझी मेहनतहि गावाला अर्पण करीन. गावात ज्याला मेहनत करण्याची सवय नाही त्याच्या मदतीसाठी मी धावून जाईन

विनोबाजी म्हणतात की मी गरीबाजवळून चार कारणासाठी दान मागतो. पहिली गोष्ट . आपल्यापेक्षा अधिक गरीबाला मदत

"करणे हा प्रत्येकाचा धर्म आहे दुसरी गोष्ट: जमिनीवरील सर्वांची आसक्ति नष्ट करावयाची आहे जमीनीवर कोणाचीच मालकी नको जसा श्रीमत शेकडो एकराचा मालक आहे तसाच गरीबहि दोनचार एकराचा मालक आहे मजूर पण श्रमावर आपली मालकी मानतो या लहान मालकीवरच मोठी मालकी आधारलेली आहे. तिसरी गोष्ट. गरीबाच्या दानाने श्रीमंताची हृदये पाझरतील. एक नैतिक शक्ति निर्माण होईल व चौथी गोष्ट गरीबाच्या दानाने सत्याग्रहीची सेना बनेल ते ह्या आंदोलनाचे शिपाई बनतील

परोपकारी लोकाच्या लक्षात गरीबापासून दान घेण्याचा अर्थ येत नाही. आपण जाणतो की श्रीकृष्णाने सुदाम्याचे पोहे घेतल्याखेरिज त्याला काही दिले नाही त्याच्यापासून घ्यायचे थोडेच होते? त्याला तर द्यायचे होते पण घेतल्याखेरीज काही न देण्याचा निष्ठुरपणा कृष्णाने दाखविला कारण सुदाम्याची शक्ति ते वाढवू इच्छित होते त्याला भिकाऱ्यासारखा दीनवाणे बनवू इच्छित नव्हते जमीन वा श्रम दिल्याने गरीबाची शक्ति वाढेल. गरीब किती त्याग करतात! त्यांच्याच श्रमावर सारे जग चालत आहे पण त्यांना त्यांच्या त्यागाचे व शक्तीचे भान नाही ते जेव्हा आपल्या शेजाऱ्याकरिता, गावाकरिता श्रमदान देतील तेव्हा त्यांना त्याग प्रकट होईल त्यांच्या त्यागासमोर कंजूस असलेले श्रीमंत टिकू शकणार नाहीत जे श्रीमंत उदार आहेत ते तर यापूर्वीच ग्रामदानात सामील झालेले असतील.

**सावकार**—समाजात पैशाचा लोभ वाढल्यामुळे सावकारहि लोभी बनले आहेत. ग्रामदानी गावात सर्वांनी आपला लोभ सोडल्यामुळे,सावकारहि आपला स्वार्थ साधणार नाही सहकारी दुकानामार्फत जे कर्ज गाववाल्याना दिले जाईल त्याबाबतीत त्याचा सल्ला व मार्गदर्शन गावाला मिळेल गावहि त्याची सर्वाप्रमाणे काळजी घेईल.

**व्यापारी**—आज भावात चढउतार झाला, माल खराब निघाला तर दुकानदाराला खोटी वजने, मापे आदि खोट्यानाट्या गोष्टी करण्याचे पाप करावे लागते ग्रामदानी गावात गावाचे मिळून एकच दुकान राहील त्यामुळे दुकानदाराला नफ्यातोट्याची चिंता राहणार नाही उत्तम मार्गाने गावाची सेवा करून निश्चितपणे त्याला सच्छील जीवन जगता येईल

**शिक्षक, पटवारी, कलाकार इत्यादि** अनेक बुद्धिचे श्रम करणाऱ्याचे समाजात काय स्थान राहील ?

प्रत्येकाला शरीराच्या स्वास्थ्यासाठी व बुद्धीच्या विकासासाठी शरीरश्रम करणे आवश्यक आहे म्हणून हे सर्व लोक काही तास शरीरश्रम करतील आपल्या कलेचे व ज्ञानाचे दान देऊन गावाला ज्ञानी व सुदर करून सोडतील गाव त्याची चिंता वाहील.

**कारागीर**—ग्रामदानी गावात कारागिराबद्दल, उद्योगधंदे करणाऱ्या लोकाबद्दल काय कार्यक्रम राहील ?

गावात कुभार, चाभार, लोहार, सुतार, न्हावी, शिंपी, इत्यादि अनेक धंदेवाइक लोकाचे धंदे बुडत चालले आहेत त्याच्या

शिक्षणाची, त्याच्या धद्यासाठी भाडवल मिळण्याची व माल विकण्याची काही सोय नाही त्याची स्थिति दिवसेदिवस विघडत आहे.

ग्रामदानी गावात होतकरू मुलाना धदेशिक्षण देण्यासाठी चागल्या शिक्षणसस्थेत पाठविण्याची गाववाले व्यवस्था करतील. धद्यासाठी लागणारे भाडवल गाववाले व सरकार देईल तसेच त्याच्या धद्याला लागणाऱ्या कच्चा मालाच्या खरेदीची व पक्क्या मालाच्या विक्रीची व्यवस्था दुकानामार्फत केली जाईल त्यामुळे धदे वाढून बेकारी नष्ट होईल गावाची लक्ष्मी गावात राहून गावातील कारागीर व धदेवाईक सुखी होतील

**स्त्रिया**––आपली सर्व मुले सुखी असावी हीच सर्व माताची इच्छा असते तीच गोष्ट धरतीमातेला आपल्या सर्व मुलाबद्दल वाटत नसेल काय ? मातृशक्ति हीच स्त्रियाची मोठी शक्ति आहे. म्हणून आपल्या घरची सर्व जमीन ग्रामदानात अर्पण करून ह्या धार्मिक कार्यात त्यानी मदत करावी

आजच्या समाजात चूल व मूल ह्या पलिकडे स्त्रियाना काही स्थान नाही ग्रामदानी गावात स्त्रियाना पुरुषाच्याप्रमाणेच त्याच्या जीवनास आवश्यक असणारे शिक्षण दिले जाईल शेती व घरकामाशिवाय अनेक हस्तव्यवसाय व कलेची कामे त्या शिकतील. गावाचा कारभार चालविण्याची त्याना पुरुषाच्यावरोवरीची संधि मिळेल. घरच्या जेलखान्यातून त्याची सुटका होऊन समाजात त्याना मानाचे स्थान प्राप्त होईल.

अशा रीतीने ग्रामदानात सर्वाचेच हित आहे. म्हणून लोक ग्रामदान करीत आहेत. अशा या ग्रामदानी गावातून ग्रामराज्य कसे निर्माण होईल इकडे आता आपणास वळले पाहिजे.

---

प्रकरण सातवें

# ग्रामराज्य

राज्यकारभार——ग्रामराज्याचे सघटण खालीलप्रमाणे राहील. प्रत्येक गावी एक ग्रामसभा राहील या ग्राममभेवर प्रत्येक कुटुबातून एक प्रौढ पुरप अथवा स्त्री राहील ग्रामसभा सर्वसमतीने पाच ते नऊ व्यक्तीची एक सर्वोदयपचायत बनवील शेती, ग्रामोद्योग, शिक्षण, आरोग्य, योजना, न्याय, अन्य खेडयाशी व सरकारच्या घटकाशी सबध आदि सर्व कामे ग्रामसभेकडे राहतील ग्रामसभा सर्वसामान्य धोरण ठरवील पचायत या धोरणाची अमलबजावणी करील पचायत दररोजचे कामकाज करील पचायत गावातील लोकावर सत्ता चालविण्याकरिता नाही पण कुटुबात आईबाप जसे आपल्या मुलाबाळाची काळजी घेतात तशी ही पचायत सर्वांच्या कल्याणाची चिंता वाहील

अशा अनेक सर्वोदयपचायती आपणामधून एखाद्या शाहण्या माणसास शभर गावाची जी तालुकापचायत बनेल तेथे पाठवितील. अशा अनेक तालुकापचायती आपणामधून जिल्हापचायत बनवितील. याच पद्धतीने प्राताकरिता, देशाकरिता व जगाकरिता सरकार बनेल जसजसे आपण वरवर जाऊ तसतशी सत्ता क्षीण होत जाईल शेवटी विश्वपचायतीजवळ केवळ नैतिक सत्ता राहील ग्रामसभा जितकी व ज्या विषयाबावत सत्ता वरच्या पचायतीस देईल तीच त्याची

सत्ता राहील या सर्व पचायतीचे कामीत कमी एक चतुर्थांश सदस्य भगिनी असतील

ग्रामसभेची व सर्व पचायतीची कामे एकमताने चालतील काही किरकोळ मतभेद असले तर लोक आपले मतभेद कायम ठेऊन आचरणाच्या वेळेस तटस्थ राहतील यास आपण सहमति म्हणू महत्वाच्या मुद्यावाबत मतभेद झाल्यास त्या वेळेस तो विषय सोडून देण्यात येईल एकमत होईपर्यंत सर्व लोक वाट पाहतील पण कोणत्याहि परिस्थितीत वहुमत व अल्पमत राहणार नाही आपणास तीन मुखी परमेश्वर किंवा चार मुखी परमेश्वर हा न्याय लागू करावयाचा नाही 'पाचा मुखी परमेश्वर' हा जुना न्यायच कायम ठेवावयाचा आहे

गावातील आर्थिक व्यवहार सुरळित चालविण्याकरिता व या बावतीत गावकऱ्याचे मार्गदर्शन करण्याकरिता दर गावात एक सहकारी समिति राहील ही समिति गावोगाव मालाच्या खरेदी-विक्रीकरिता स्टोअर चालवील गावकरी आपला माल सोसायटी-मार्फत विकतील व खरेदी करतील गावकरी सावकारापासून कर्ज काढणार नाहीत सहकारी समिति गावाची सर्व बाजूनी होणारी आर्थिक लूट थांबवील व सर्वांस काम देण्याची योजना बनविण्यात मदत करील गावातून बाहेर जाणाऱ्या व आत येणाऱ्या मालावर सोसायटीचे नियत्रण राहील अशा रीतीने दारिद्र्य हटवून गावात समृद्धि आणण्याच्या कामात सहकारी समिति पुढाकार घेईल

ग्रामपचायतची, सोसायटीची व गावकऱ्याची अन्य कामें सुर-ळित चालविण्याकरिता मदत करणारा एक सेवासमुदाय राहील.

हा सेवकवर्ग सत्तेत जाणार नाही सर्वांहून अधिक काम व त्याग करणारा हा वर्ग राहील. सर्वांचे भले चाहणारा हा सेवकवर्ग ग्रामराज्यास आकार देण्याचे काम करील असा सेवकसमदाय हा ग्रामराज्याच्या पाठीचा कणा आहे. या सेवकाची सख्या जितकी अधिक व याची पातळी जितकी उच राहील तितकी गावाची प्रगति लवकर होईल.

ग्रामराज्यात कामें कशी होतील व ती कोण करतील हे आपण पाहिले आता ग्रामराज्यात कोणती कामे चालतील इकडे आपण वळू

**शेती**—शेती हा गावाचा प्रमुख धदा या शेतीची व्यवस्था कशी करावी याबद्दल गावकरी सर्व मिळून ठरवितील तीन पद्धति सभवतात

(१) सर्व शेती सामुदायिक करणे (२) गावाकरिता काही शेती सामुदायिक ठेवणे, काही लोकाची सहकारी शेती व उरलेली शेती अलग अलग वहिवाटीस आणणे (३) गावाकरिता काही शेती सामुदायिक ठेवणे व उरलेल्या शेतीची अलग अलग वहिवाट करणे

(१) प्रथम आपण सामुदायिक शेतीचा विचार करू गावकरी विचार करतील की आपण गावास मालकी समर्पण केली आता शेतीची मशागतहि एकत्रच करू अशा सामुदायिक शेतीची व्यवस्था सर्व गावकरी पाहतील दररोजचे काम चालविण्या-करिता एक शेतीसमिति ग्रामसभा निवडील आलेल्या उत्पन्नातून

शेतसारा, शाळा, दवाखाना आदि सामुदायिक कामे केली जातील. पुढील वर्षाकरिता भाडवलहि काढून ठेवले जाईल सकटाकरिता उत्पन्नाचा काही भाग धान्यकोठीत जाईल उरलेले उत्पादन सर्व शेतकरी आपापसात वाटून घेतील ज्याने जितके काम केले असेल त्या प्रमाणातहि लोक उत्पन्न वाटू शकतील त्याहूनहि उत्तम म्हणजे ज्याच्या घरात जितकी माणसे असतील त्या हिशेबाने उत्पन्न वाटले जाईल किंवा या दोहोच्या मधला मार्ग निघू शकेल सामुदायिक शेतीत सर्व लोक श्रमदान करतील यातून मिळालेल्या उत्पन्नातून शेतसारा, शाळा, दवाखाने, देवस्थाने आदि सार्वजनिक सस्थाचा खर्च चालेल आज वाईंत सामुदायिक शेती चालू आहे

नुसती सामुदायिक शेतीच नव्हे तर सामुदायिक जीवनाचे एक चागले चित्र पॅलेस्टाईनमध्ये किवट्झ नावाच्या अडीचशे गावानी ( लोकवस्त्यानी ) निर्माण केले आहे किवट्झमध्ये सामुदायिक रसोडा आहे शेतीचे पीक सदस्यात ते वाटत नाहीत किवट्झ सदस्याच्या सर्व गरजा पुरविते पॅलेस्टाईनमधील लोकाना क्विट्झ भूतलावरील स्वर्ग वाटतो

(२) किंवा जितके गावकरी तयार असतील तितके सामुदायिक शेती करतील थोडीशी शेती सवध गावाकरिता सामुदायिक शेती म्हणून काढून ठेवली जाईल बाकीची शेती उरलेले लोक अलग अलग करतील आज मगरोठमध्य हा प्रयोग चालू आहे

(३) किंवा गावकरी असेंहि ठरवतील की सर्व शेती अलग अलग वहवाटीकरिता वाटून घेऊ फक्त थोडीशी ( दहाव्या हिस्स्यापर्यंत) शेती सामुदायिक ठेवू हा तिसरा प्रकार झाला.

शेती वाटताना ज्याच्या घरात जेवढी माणसे असतील त्याप्रमाणात शेतीची वाटणी होईल ज्याचा मुख्य धंदा शेती नसून दुसरा आहे असे सुतार, शिक्षक, तेली, चांभार आदीनाहि थोडी जमीन मिळेल हलकी व भारी अशी सर्व प्रकारची जमीन सर्वांना मिळेल दर पाच दहा वर्षांनी आवश्यकतेनुसार शेतीची फेरवाटणी गावसभा करील प्रत्येक कुटुंबास शेतावर मेहनतीने पैदा केलेले पीक मिळेल

अशा रीतीने शेती सामुदायिक राहील किंवा वहिवाटीकरिता प्रत्येकास मिळेल पण शेतीवर मालकी कोणत्याहि व्यक्तीची राहणार नाही शेती देवाची आहे ज्याप्रमाणे हवा, पाणी, आकाश व प्रकाश ह्यांचा मालक परमेश्वर त्याप्रमाणे पंचमहाभूतांपैकी उरलेल्या पृथ्वीचा म्हणजे जमीनीचा मालकहि परमेश्वरच शेती परमेश्वरातर्फे गावास उदरपोषणाकरिता मिळालेली आहे म्हणून शेतीचे ग्रामीकरण होईल कोणीहि गावातील शेती विकू शकणार नाही गहाण, ठेका, मक्ता, बटाई आदि प्रकारांनी दुसऱ्यास देऊ शकणार नाही मधल्या काळात लोक जमीनदाराची शेती श्रमदानाने वाहून देतील हळूहळू जमीनदार व त्यांची मुले शेतीवर श्रम करावयास लागतील अथवा अन्य धंदे शोधतील इतःपर कोणाचीहि शेती सावकाराकडे जाणार नाही अशा रीतीने ग्रामदानामुळे शेतकरी शेती गहाण ठेवून कर्ज मागण्याचा लोभ करू शकणार नाही व गहाण ठेवून सावकाराचाहि लोभ बळावणार नाही गावाच्या मालकीच्या या युक्तीमुळे शेतकरी व सावकार दोघांच्याहि लोभास आळा बसून त्यात दोघांचेहि कल्याण साधले आहे

शेती अलग अलग ठेऊनहि लोक मशागतीच्या काही कामात जसे पेरणी, रखवाली, नागरण आदि क्षेत्रात सहकार करू शकतील. काही छोटी औजारे व्यक्तीची राहतील काही मोठी औजारे गावाची राहतील मालाची खरेदी विक्री सहकारी भाडारामार्फत चालेल शेतीची वहिवाट अलग अलग ठेवली तरीहि इतका सहकार होऊ शकतो गावात शेती सामुदायिक झाली किवा काही कामें सहकाराने झाली याचा अर्थ सर्व चुली एकत्रच होतील असा नव्हे.

शेतीत छोटया सुधारणा करण्याची जबाबदारी प्रत्येक कुटुंबावर राहील. शेतीतील मोठ्या प्रमाणावरच्या सुधारणा सामुदायिकरीत्या गावसभा करील गावास जे जे लागेल ते ते गावकरी पेरतील उत्पन्नात मुख्य दृष्टि बाजाराची न राहता गरजा पूर्ण करण्याची राहील म्हणून डाल्डाकरिता भूईमूग पेरला न जाता खाण्याकरिता जेवढा लागतो तेवढाच पेरला जाईल गावात दोन वर्षाचे धान्य नेहमी शिल्लक राहील. योग्य भाडवल विनव्याजी वापरावयास मिळेल ग्रामदानी गावात ठेका व नफा जसे समाप्त होतील तसेच व्याजहि समाप्त होईल. पाणीपुरवठा, चागले बी, सुधारलेली औजारें, बाध्या घालून जमीनीची धूप थाबविणे व जमीनीस ममतत्व करणें इत्यादीमुळे शेतीचें उत्पन्न वाढेल नुसती जमीनीचीच धूप ध्यानी घेतली तर दर पावसाळ्यात तीस कोटी एकरापैकी पधरा कोटी एकर जमीनीतील दर एकरी ५०।६० गाड्या माती वाहून जाते. धूप थाबविण्याचे प्रयत्न एकटया, दुकट्याने व सरकारने केल्याने होणार नाही. त्यासाठी गावातील सर्वांचे हात

लागले पाहिजेत व जमीन गांवची झाली पाहिजे. या सर्व सुधारणां-मुळे हंगामाचा अनिश्चितपणा कमी होईल. गांवांत ना कोणी मालक ना कोणी मजूर. सर्वच गांवांचे सेवक बनतील.

**ग्रामोद्योग**—पण नुसत्या शेती सुधारणेने ग्रामराज्य स्थापन होणार नाही. ज्याप्रमाणे भारतांत आपण सर्व वस्तु पैदा करण्याचा प्रयत्न करतो, त्याप्रमाणे प्रत्येक खेड्यांत प्राथमिक गरजा तरी पुऱ्या झाल्या पाहिजेत. म्हणजे अन्न, वस्त्र, घरें, शिक्षण व आरोग्य या गोष्टी गांवांतच पुऱ्या करूं. गांवांत तयार होणाऱ्या कच्च्या मालाचा पक्का माल शक्य तोंवर गांवांतच बनविण्यांत येईल. अंबर चर-ख्याने कपडा तयार करणें बरेंच सोपें झालें आहे. गांवांत तेलघाणी राहील. अन्य उद्योगधंदे चालतील. त्यामुळे गांवांत प्रत्येकास काम मिळेल व गांवांतून बाहेर जाणारा संपत्तीचा प्रचंड लोंढा थांबेल. एक शेर कापसाची किंमत एक रुपया तर त्यांतून उत्पन्न होणाऱ्या कापडाची किंमत पांच रुपये. एकपट उत्पन्न आपण ठेवतों व चौपट गमावतों. उद्योगामुळे कलाकौशल्य गांवांत परत येईल. गांवां-तील आर्थिक इमारत एकखांबी शेतीवर न राहता अनेक आधारांवर उभारल्यामुळे अधिक स्थिर होईल. आज मोठ्या उद्योगांद्वारा फक्त पंचवीस लाख लोकांना काम मिळत आहे. शंभर वर्षांत इतकी प्रगति झाली. यंत्रोद्योगांकरिता भांडवलहि नाही. स्वाव-लंबन व ग्रामोद्योग हाच खेड्यांना तारणारा मंत्र आहे. खेड्यांतील प्रत्येक कुटुंबाजवळ जमीन राहील व तें कुटुंब आपल्या घरींच शेतीला जोडधंदा म्हणून उद्योगहि करील. अनेक धंदे केल्यामुळे कुटुंबाची सांस्कृतिक दृष्टीने पण उन्नति होईल.

**शिक्षण**—गावोगाव शाळा राहील  ही शाळा जीवनास उपयोगी सर्व शिक्षण देईल  कर्तुत्वशून्य विद्यापिठापेक्षा ही शाळा हे खरे विद्यापीठ बनेल  बुनियादी तालीमच्या नव्या पद्धतीने शिक्षण दिले जाईल  त्यामुळे ग्रामराज्याचा अभिमान बाळगणारे उत्तम नागरिक खेड्यातून निर्माण होतील  सुरवात म्हणून प्रत्येक गावात सकाळची एक तासाची शाळा चालेल  हळूहळू तिचे रूपान्तर पूर्ण वेळेच्या शाळेत होईल  प्रौढासाठी रात्री एक तास वर्ग चालेल

**आरोग्य**—गाव बाहेरच्या डॉक्टरावर अवलबित न राहता गावातील मुद्दाम लावलेल्या वनस्पतीतून औषधे बनतील  आरोग्याचे नियम सर्वास माहित असल्याने रोग आटोक्यात येतील यामुळे शिक्षण व आरोग्याच्या निमित्ताने शहराकडे जाणारा पुष्कळसा पैसा वाचेल

**न्याय**—आर्थिक रचना  चढाओढीऐवजी एकमेकाच्या मदतीवर अुभारल्यामुळे व गरीबी मिटल्यामुळे झगडे तटे कमी होतील गुन्ह्याचे मूळ शोधून ते मिटविण्याची दृष्टि न्यायदानात राहील गुन्हेगारास मानसिक रोगी समजून त्यावर योग्य उपचार करण्यात येतील  उदाहरणार्थ गरीबीमुळे चोरी करणाऱ्यास शेती दिल्याचे आपण मागे पाहिले  ज्या गावात झगडे तटे होत नाहीत ते रामराज्य आपले उद्दिष्ट रामराज्याकडे जाण्याचे राहील

**लूट कशी थांबेल?**—या सर्व गोष्टी गावातच झाल्यामुळे गावातील बुद्धि, श्रम व पैसा शहराकडे जाणे बरेच कमी होईल  ग्रामदानी गावात खाजगी सावकारी वा व्यापार चालणार नसल्यामुळे व्याज व

नफा सपले  जमीनीची मालकी सपल्यामुळे ठेकाहि वद झाला. सरकारची वगैचशी कामे ग्रामसभेची झाल्यामुळे व ग्रामसभा बरे-चसे काम श्रमदानाने करवून घेणार असल्याने सरकारचे डोईजड कर कमी होतील  पुन्हा काही सार्वजनिक कामाचा खर्च सामुदायिक शेतीच्या उत्पन्नातून चालेल  त्यामुळे ग्रामसभेचेहि कर वाढणार नाहीत  अशा रीतीने व्यापारी, सरकार, सावकार, व्यसने, अज्ञान व रीतिरिवाज (शिक्षण व आरोग्य यात आलेच) या पाच छिद्रानी रिकामी होणारी मोट आता भरून राहील  अशा रीतीने शोप-णाचे सर्व दरवाजे वद झाले  शेती सुधार व ग्रामोद्योगामुळे मोटेमधे उलट जास्त पाणी टाकल्यामुळे ती तुडुब भरून येईल

**सामाजिक सुधारणा**—आता आपण सामाजिक सुधारणाकडे वळू  ग्रामदानामुळे गावातील जातिभेद क्षीण होतील  स्त्रियाना पुरुषाच्या बरोबरीचा व सन्मानाचा दर्जा मिळेल  गावकरी व्यसने सोडतील  दारू, जुवा, फीचर, आदि वद होईल  आज काय-द्याने दारूवदी अनेक ठिकाणी असूनहि दारू सर्रास वनविली जाते, व ती विकली जाते  परतु ग्रामराज्यात सर्व सत्ता गावकऱ्याच्या हाती राहील  कोण मनुष्य कसा आहे ही गावातील माहिती गाव-कऱ्याना असल्याने असे प्रकार वद करणे सोपे होईल

गावातील मुलामुलीची लग्ने सामुदायिक पद्धतीने होतील सर्व गावकरी आपल्या गावाच्या मुलामुलीच्या लग्नात आनदाने भाग घेतील  अशी लग्ने कमी खर्चात होतील  व या खर्चाचा भार सर्व लोक वाटून घेतील  त्यामुळे मुलामुलीच्या आईवडिलावर

फार भार पडणार नाही सात्त्विक मनोरजनाची सोय गावात होईल गावातील स्वयसेवक दल वा शातिसेना ग्रामराज्याचें रक्षण करील

**पचवार्षिक योजना**—ही सर्व व अशीच अनेक कामे करून ग्रामराज्य सुखी बनविण्याकरिता गावचे सर्व लोक मिळून आपली पचवार्षिक योजना बनवतील प्रत्यक गावाची अलग अलग योजना बनेल ही योजना पार पाडण्याची जबाबदारी प्रथमच गाववाल्यावर येईल आज योजना दिल्लीत बनते त्यामुळे गावकऱ्यात योजना सफल करण्याबाबत उत्साह आढळत नाही आज सर्वाची प्रवृत्ति काम टाळण्याकडे व जबाबदारी आपल्या अगावर न घेण्याकडे आहे सरकारी नोकराना व समाजसेवकाना याचा अनेकवार अनुभव येतो सर्व काही सरकारने वा सेवकानी कराव, आमची जबाबदारी फक्त उपभोग घेण्याची असे गावकरी मानतात आजच्या स्वराज्यात ना जबाबदारी मजूराची ना धड मालकाची प्रत्येक जण दोषाचें खापर दुसऱ्याच्या माथी फोडण्यास तयार आहे

आता ग्रामराज्य झाल्यामुळे आपल्या सुखदु खास गावकरीच जबाबदार राहतील त्यामुळे गावातील अगतिकतेची व निरुत्साहाची भावना लोपेल गाव आपल्या पायावर उभे राहू शकतें हा आत्मविश्वास प्रथमच अनेक पिढ्यानतर गावकऱ्याच्या अगी येईल गावकऱ्याच्या शक्तिबुद्धियुक्तीस सपूर्ण वाव मिळेल शोषणावर आधारलली रचना समाप्त झाल्यामुळे ही ग्रामराज्यें सर्व दिशानी झपाट्याने प्रगति करतील अनेक गावाचें उत्पन्न दोनतीन

वर्षांतच दुप्पट होईल. सामाजिक व नैतिक प्रगतीच्या क्षेत्रांत अनेक चमत्कार होतील.

**सर्वोदयी समाजाचें चित्र**—विनोबाजींना लोक विचारतात की ग्रामराज्य स्थापन करून जो सर्वोदयी समाज तुम्ही बनवूं अिच्छितां ह्यांत लक्ष्मी वाढेल कीं कमी होईल ? लोकांना वाटते विनोबा पायीं चालतो, थोडा कपडा वापरतो व परिग्रह सोडून बसलेला आहे. तेव्हा सर्व समाजाला तो आपल्यासारखाच साधुसंन्यासी बनवूं अिच्छितो. विनोबाजी म्हणतात, " मी लोकांना समजावू अिच्छितों कीं आपल्याला असंग्रहाच्या तत्त्वावर समाज उभा करावयाचा आहे. पण असंग्रहाचा अर्थ लोक समजलेले नाहीत.

आज हिन्दुस्थानांत सर्वोदय समाज नाही. संग्रह वाढविण्याचें वेड लोकांना लागलेले आहे. पण अितकी संग्रहनिष्ठा असूनहि ह्यांनी कितीसा संग्रह केला आहे ? आजच्या संग्रही समाजांत घरांतील प्रत्येक माणशीं सरासरी अडीच छटाक दूध पडते. पण विनोबाच्या असंग्रही समाजात माणशी एक शेर दूध राहील. आजच्या संग्रही समाजांत धान्याचा वर्षभराचा साठा असेल की नाही याविषयी शंका आहे. पण माझ्या असंग्रही समाजांत दोन वर्षांचें पूरें धान्य राहील. प्रत्येक घरांत अन्न खूप राहील. तें अितकें राहील की त्याला किंमतच राहणार नाही. अन्नाची, किंमतच काय? कोणी भुकेला असेल, लोक त्याला खाऊं घालतील. पण कोणी अन्न विकणार नाही. डाल्डा खाणाऱ्याला तूप खाण्यास मिळेल. कारण सर्वोदय समाजांत तूप खूप राहील. भाजी भरपूर राहील. कोणाच्याहि घरात जा, तुम्हाला जेवण मिळेल. अशा असंग्रही समाजांत दूधच काय मधाचीहि महानंदी वाहील.

म्हणून पहिली गोष्ट; असग्रही समाजांत विनोबा अितका मोठा संग्रह वाढवू इच्छितो. लोकाना ह्याची कल्पना नाही. पण हा साठा थोड्याशा घरांत तो वाढवूं इच्छित नाही. तो प्रत्येक घरात वाटून देऊ इच्छितो. ही दुसरी गोष्ट. सग्रहाची समान वांटणी होईल. संग्रह खूप राहील. पण तो घरात नाही, समाजांत राहील.

तिसरी गोष्ट; हा सग्रह निरूपयोगी वस्तूचा राहणार नाही. आज सीगरेट विड्यांचे लागलेल ढीग ग्रामराज्याच्या संग्रहांत बसणार नाहीत.

चौथी गोष्ट; चागल्या वस्तूच्या संग्रहांतील क्रम पहावा लागेल. आजच्या क्रमाला काही अर्थ नाही.

नंवर एक उत्तम जेवण मिळाले पाहिजे,

नवर दोन पुरेसा कपडा पाहिजे,

नंवर तीन उत्तम घरें राहावयास पाहिजेत,

नंवर चार चांगली साधने व औजारें मिळाली पाहिजेत,

नंवर पाच ज्ञानाची साधने, उत्तम पुस्तकें मिळाली पाहिजेत,

नंवर सहा मनोरंजनाची, साधनें, सगीतादि लोकांना प्राप्त झालीं पाहिजेत. या क्रमाला अनुसरून वस्तु वाढविल्या पाहिजेत.

आज शहरांत स्थिति अशी आहे कीं खायला मिळत नाही पण लोक कपडे चागले घालतात. सारांश कोणती वस्तु आधी आणि कोणती मागाहून हें पाहिलें पाहिजे. असग्रहाचा अर्थ क्रमयुक्त संग्रह. पाचवी गोष्ट; अपरिग्रही समाजांत पैसा कमीत कमी राहील. पिस्तूल रोखून थैली घेऊन जाणें, चोरी किंवा लूट आहे. नोट

देऊन तूप घेऊन जाणें हीहि तशीच चोरी आणि लूट आहे. पैसा हें राक्षसाच्या हातचें शस्त्र आहे. पैशाने चोरी सुलभ होते. ती रात्रीं करावी लागत नाही. दिवसा करता येते. ज्याच्याजवळ दूध, दही, भाजीपाला व धान्य आहे तो गरीब व ह्यांपैकी कोणतीहि वस्तु नसून फक्त पैसा आहे तो श्रीमान् किंवा धनी असा भ्रम पैशामुळे झालेला आहे. म्हणून पैसा कमी राहील. अशा पांच लक्षणांनी युक्त असंग्रही समाज ग्रामराज्यांत राहील."

हें झालें सर्वसाधारण ग्रामराज्याचें चित्र. पण शेवटी तर गांव कसें असावें हें ठरविण्याचा जन्मसिद्ध अधिकार गांवकऱ्यांचा आहे. गांवकरी मेंढरें नाहीत. म्हणून त्यांना हाकलण्याकरिता धनगराची गरज नाही. जे गांवांत राहतात तेच आपल्या गांवास योग्य आकार देतील. बाहेरील लोक त्यांना सल्ला देतील. परंतु गांव कसें असावें हें ठरविण्याची व त्याप्रमाणे करून दाखविण्याची सर्व जबाबदारी खेडुतांची राहील. स्वराज्यप्राप्तिनंतर आम्ही अधिकच परावलंबी झालों. सर्व गोष्टी आता सरकार करील अशी लोकांची समजूत आहे. याहून अधिक चुकीचा व भयानक विचार दुसरा नाही. स्वराज्याचा अर्थ परक्यांची गुलामगिरी जाणें एवढाच नाही. स्वराज्याचा अर्थ प्रत्येकाला हें आपलें राज्य आहे असें वाटलें पाहिजे. स्वराज्य आपण निर्माण करणारे आहोंत. आमचें खाणें ज्याप्रमाणें आम्हीच खाल्लें पाहिजे तरच भूक शमेल त्याचप्रमाणे आमचें ग्रामराज्यहि आम्हीच निर्माण केलें पाहिजे. तरच आमचें दुःख जाईल. भगवंतांनी गीतेंत म्हटलें आहे कीं, 'उध्दरेदात्मनात्मानम्.' आपला उध्दार करणे आपल्याच हाती आहे.

प्रकरण आठवे

# शंका समाधान

पण मग काही प्रश्न उभे राहतात काही शंका मनात उठतात त्याचाहि आपण विचार करु

प्रश्न —खेड्यातील बहुतेक शेतकऱ्यावर कर्ज आहे हे कर्ज सावकाराने शेती गहाण ठेवून वा शेतीच्या भरवशावर दिले आहे त्याची फेड कशी होईल ?

उत्तर —शेती सर्व गावाची झाल्यामुळे आता कर्जहि सर्व गावाचे झाले आता ऋणको स्वत सावकाराशी बोलणार नाही सर्व सावकारास गावसभेतील प्रमुख मंडळी भेटतील व या कर्जातून मुद्दल किती, योग्य कायदेशीर व्याज किती व अयोग्य व्याज किती हे उकलून पाहतील अयोग्य व्याज देण्याचा प्रश्नच उरत नाही योग्य व्याज व मुद्दल म्हणून किती फेड झाली हे पाहण्यात येईल जर काही रक्कम उरली असेल तर ती सपत्ति-दानात दान करण्याविषयी सावकारास विनती करण्यात येईल या आर्तीतील करुणेचा स्पर्श सावकाराच्या हृदयास का होणार नाही ? सावकाराने शेतकऱ्यांची लग्न, शेती, नापिकी आदि कठिण प्रसगी गरज भागविली तो सावकार गावाचे भले का चाहणार नाही ? त्याच्या उपकाराची फेड प्रेमानेच होऊ शकेल उपकाराची फेड काय पैशानी होणार आहे ? सावकारास त्याचे भान नाही

जर पूर्ण कर्ज त्याने संपत्तिदान म्हणून सोडले नाही तर उरलेली रक्कम गावातील पिकातून पाचदहा वर्षात हप्त्याहप्त्याने दिली जाईल गावातील शेती वा उद्योगाकरिता मिळालेल्या संपत्तिदान, साधनदान व सरकारी मदत ह्या रकमेतून ही कर्जफेड केली जाणार नाही ही कर्जफेड गावकऱ्याच्या वाढल्या उत्पन्नातून दरवर्षी होईल कोणाचेहि कर्ज बुडविले जाणार नाही याची सावकारानी खात्री बाळगावी पाचदहा वर्षात गाव जुन्या कर्जातून मुक्त होऊन जाईल जे काम ह्या शभर दोनशे वर्षात कोणत्याहि कायद्याने वा सहकारी पतपेढयानी साधले नाही, ते पाच दहा वर्षात साधेल गावावरचा चितेचा अेक फार मोठा बोजा ग्रामदानाने प्रथमच हलका होईल भारतात सर्वत्र ग्रामदान झाल्यावर म्हणजे भारतदान झाल्यावर सावकाराचेच मन बदलेल म्हणून जसजशी ग्रामदाने वाढत जातील तसतसा हा प्रश्न सोपा सोपा होत जाईल म्हणून ग्रामदाने वाढली पाहिजेत

प्रश्न —नवीन भाडवल शेतीस, उद्योगास लागेल ते कोठून मिळेल ?

उत्तर —आज भाडवल, पैसा जास्त का लागतो ? कारण अनेक लोक स्वत काम करीत नाहीत मजुराकडून काम करवून घेतात आता सर्व लोक मेहनत करू लागल्यामुळे भाडवलाची गरज काही अशी कमी होईल परस्पराना श्रमदानाने मदत करण्याची वृत्ति वाढवल्यामुळेहि पूर्वीअितके पैसे लागणार नाहीत तसेच पैशाने बाहेरील अनेक अनावश्यक गोष्टी आपण विकत घेतो

ती वृत्ति कमी होईल तरी काही भाडवल लागेल त्यापैकी काही रक्कम शहरातील सपत्तिदानातून, साधनदानातून मिळेल प्रत्येक कुटुब काही बचत करील, गावाला सपत्तिदान देईल वा काही धान्य धान्यकोठीत देईल त्यातूनहि काही भाडवल मिळेल तरीहि आरभीच्या पाच दहा वर्षात काही भाडवल लागेल ते अल्प-व्याजाने सहकारी समिति व सरकारकडून ग्रामसहकारीसमिति घेईल व गावकऱ्यास देईल पण कोणीहि खेडुत एकेकटा केंद्रीय सहकारी समिति वा सरकारजवळून कर्ज घेणार नाही अित पर गाव सघटितपणे बाहेरच्या सस्थाशी व्यवहार करील सघटितपणे कर्ज घ्यावयाचे असल्यामुळे कोणीहि लग्नासारख्या अनुत्पादक कामाकरिता कर्ज घेऊ शकणार नाही त्यामुळे अयोग्य कर्जाना आपोआपच आळा बसेल त्यामुळे सरकारची व केंद्रिय सहकारी बँकाची उचित मदत लवकर कमी व्याजाने गावकऱ्याना मिळ् शकेल पाच दहा वर्षानतर गावातील सपत्तिदान, धान्यकोठी व बचत अितकी मोठी होईल व गावाचे उत्पन्नहि अितके वाढेल की नित्याच्या व्यवहाराकरिता खेडेगावास बाहेरून भाडवल आणण्याची गरज भासणार नाही तेथपर्यंत मधल्या काळात अल्पव्याजाचा भार खेड्याना सोसावा लागेल कर्ज उत्पादनाकरिताच मिळेल

प्रश्न —आमच्या मालकीची जमीन न राहिल्यावर मुलामुलीची लग्ने कशी होतील ?

उत्तर —सबध भारतात ग्रामदान झाले तर हा प्रश्नच उरणार नाही तोपर्यंत हें काम चागलें आहे असे सर्वत्र वातावरण

बनल्यामुळे ग्रामदानी गांवांशीं सर्वांचा व्यवहार सहानुभूतीचा राहील. आपली जमीन कांही सावकाराकडे किंवा दारुजुव्यांत गेली नाही. ती तर साऱ्या गांवाची झाली. गांवांतच आपण राहतों म्हणून आपल्या वांट्यावरहि जमीन कसण्यासाठी येईल. आपण भूमिहीन झालों नाहीं. पण भूसेवक झालों. या ध्येयनिष्ठेमुळे शहरांतील अनेक बंधूंची सहानुभूति गांवांत राहील. कांही उपवर मुलींना अशा ग्रामदानी पुरुषार्थी गांवांतच आपलीं लग्नें व्हावीं अशी प्रेरणा होईल. *लग्नासारख्या आनंदाच्या प्रसंगी कर्ज काढून पिढ्यान् पिढ्या त्याचे वाईट परिणाम भोगणें हा शहाणपणा नाही.*

प्रश्न :—एखाद्या गांवांत जमीन कमी असली व माणसें जास्त असली तर तेथील प्रश्न कसा सुटेल ?

उत्तर :—ग्रामराज्यांत जमीनीस पाणी देण्याची सोय झाल्याने कमी जमीनींत जास्त माणसाचें पोषण होऊं शकेल. कांही पडित जमीनहि लागवडीखाली येईल. सुधारलेल्या शेतीने कमी जमीनींत जास्त पीक निघेल. ह्यामुळे कमी जमीनींत चांगल्या रीतीनें भागूं शकेल. गांवागांवांत ग्रामोद्योगहि स्थापन करूं. तरी हा प्रश्न पुरा न सुटल्यास शेजारच्या गांवांत जमीन जास्त व माणसें कमी असल्यास तेथील कांही जमीन या गांवच्या हद्दींत आणण्यास शेजारी गांवाचें मन वळवूं. याकरिता गांवाचे नकाशे बदलावे लागतील. मग ह्यांत अडचण कोणती आहे? ग्रामराज्यें समंजस राहतील व त्यामुळे अशा अडचणीचे निवारण होईल. अथवा आपण जास्त जमीनीच्या गांवांत येथील कांही माणसें पाठवूं. त्यांना तेथे जमीन मिळेल.

प्रश्न —ग्रामदानात जमीन वाटली जाईल पण बैल-जोड्याचा प्रश्न कसा सुटेल ?

उत्तर —ग्रामदानाचा अर्थ प्रत्येकाने आपल्याजवळ जे जे असेल ते ते सर्व गावास समर्पण करावे जे लोक मोलाच्या जमीनी देतील ते काय बैलजोड्या, अवजारे, देणार नाहीत ?

प्रश्न —हे सर्व कायद्याने का करीत नाही ? कायद्याने झाले तर आम्ही तयारच आहोत

उत्तर —कायद्याने हे काम होऊ शकणार नाही कायद्याने शेती वाटली जाऊ शकेल किंवा सामूहिक शेतीहि होऊ शकेल कायद्याने हे झाले तरी ग्रामराज्य होणार नाही दिल्लीराज्य होईल आणि कायद्याने तुटलेली मने कशी जोडली जातील ? त्याशिवाय ग्रामराज्यात लोक मन लावून कसे काम करतील ? ग्रामदानात सर्वांनी आपापल्या कुटुंबापुरते पाहावयाचे सोडून गावाच्या कुटुंबाची चिंता करावयाची आहे मालक मजुरातील, गरीब श्रीमतातील पडलेली दरी बुजवावयाची आहे कोणता कायदा हे करू शकेल ? दारूबंदीचा कायदा झाल्याने कितपत काम झाले ? एकवेळ लोकाच्या मनात बदल झाला म्हणजे मग कायदा त्यावर शिक्का-मोर्तब करू शकेल कायद्याने मालगुजारी गेली पण माल-गुजारात व जनतेत प्रेमसंबंध निर्माण झाला नाही कारण माल-गुजाराची मने बदलली नव्हती पण आज जर मालकानी जमीन गावास अर्पण केली व मजूरानी गावास श्रम अर्पण केले तर गावात नवचैतन्य सचरेल

भांडवलशाही देशांत शंभरांतून दोन चार लोक मालक असतात. बाकीचे मजूर. दोनचार लोकांची संपत्ति कायदा घेऊं शकतो. भारतासारख्या शेतकीप्रधान देशांत शेकडा सत्तर ऐंशी छोटे छोटे शेतकरी मालक आहेत. पांच मोठे शेतकरी आहेत. वीस मजूर आहेत. सत्तर ऐंशी लोकांचीं मनें वळविल्याशिवाय कायदा त्यांची जमीन कशी घेऊं शकेल? व त्यांचीं मने वळलीं तर ते ग्रामदानांत जमीन देतील. मग कायद्याची फारशी गरज राहणार नाही. म्हणून केरळचे कायदेमंत्री म्हणाले की कायद्याने जमीनीचा प्रश्न सुटूं शकत नाही. लोकांची मनें बदलल्याशिवाय क्रांति होऊं शकत नाही. आणि कायद्याने मनें बदलत नाहीत. नवीन मूल्यांची स्थापना होत नाही. कायदा झाल्यास परस्पर कटुता वाढेल, कोर्टकचेरीस ऊत येईल आदि दोष तर कायद्यांत आहेतच.

प्रश्न :—दोन भावांचेंहि जेथे आपसांत पटत नाहीं तेथे सर्व गांवकऱ्यांची शेती एकत्र कशी होईल? ती किती दिवस चालेल?

उत्तर :—आज दोन भावांचें आपसांत का पटत नाही ह्याचा विचार करावयास हवा. आपसांत न पटण्याची अनेक कारणें आहेत. त्यापैकी एक कारण मालकी हक्क हें आहे. ही मालकीच जर काढून टाकली, तर भांडणाचें मूळच नष्ट होईल. पुन्हा भावाभावात हक्काची व अधिकाराची भावना असते. म्हणून भावाने थोडेंहि कमी जास्त केले तर अपेक्षाभंग होतो. त्यामुळे भाऊ भावाशीं भांडतो. पण तेंच मित्राने थोडेसेंहि काम केलें तर आपण मित्राचे कृतज्ञ होतों. कारण मित्रांत कर्तव्याची भावना प्रबळ

असते. हक्काची भावना नसते. ग्रामदानाने हक्काची भावना जाईल व कर्तव्याची भावन येईल. त्यामुळे आज भावाभावांत पटत नसलें तरी उद्या मालकी संपल्यावर पटू लागेल.

प्रश्न .—आमच्या मुलाच्या शिक्षणाचे कसे होईल ?

उत्तर .—शिक्षण सर्वांना मिळाले पाहिजे व तें योग्य शिक्षण असले पाहिजे याबद्दल वाद नाही आज मिळणाऱ्या शिक्षणानें मनुष्य गुलाम बनतो व नोकरी शोधत राहतो ग्रामदानानंतर प्रत्येक गावात आठ वर्गापर्यंतच्या शिक्षणाची व्यवस्था हळूहळू होईल. ज्याना बाहेरच्या शिक्षणासाठी मुलें पाठवावीशी वाटतात असले लोक आपल्या मुलाना बाहेर पाठवू शकतील. गांवातील होतकरू मुलाना गावसमाजहि शिक्षणासाठी बाहेर पाठवील. शेवटी तर सर्वांकरिताच शिक्षणाची व्यवस्था गावात होणार आहे. आज जेवढा जास्त शिकला तेवढे वेतन जास्त. म्हणून पैशासाठी स्पर्धा चालते पण उद्या जास्त शिकला म्हणून अधिक पैसा मिळणार नाही. शिक्षण हे ज्ञान मिळविण्याचे, समाजसेवेचे साधन मानले जाईल साहजिकच जो हुशार असेल व ज्याला ज्ञानाची तहान असेल तोच शिक्षणासाठी धडपडेल. त्यामुळे आजसारखी चढाओढ चालणार नाही.

प्रश्न :—आज शेत माझ्या मालकीचे आहे ह्या भावनेनें मनुष्य जास्त मेहनत करतो ग्रामदानाने व्यक्तिगत मालकीची भावना नष्ट झाल्यावर कोण जास्त काम करील ?

उत्तर —मालकी नष्ट झाली याचा अर्थ गहाण, ठेका, विक्री आदि मार्गांनी शेत दुसऱ्याकडे जाणार नाही. हें तर उत्तम झालें.

यामुळे आपली शेती आपणाजवळ राहील. आपणांस वाहिवाटी-करिता मिळालेल्या शेतीचें पीक आपणासच मिळेल. दर दहा, पंधरा वर्षांनी होणाऱ्या फेरवाटपांतहि सामान्यपणे आपणांस वहि-वाटीस मिळालेल्या शेतीचा बहुतेक भाग तर आपणाकडेच राहील. लोकसंख्या वाढल्यामुळे थोडेसें कमी जास्त होईल कदाचित्. पण ज्याने ज्या शेतीत मेहनत केली तो मेहनत करण्यास तयार असल्यास त्याच्याकडेच तें शेत राहावें हे फेरवाटपाचें सामान्य धोरण राहील. म्हणून वहिवाटीकरिता शेतीहि आपली व पीकहि आपलें. पिकाच्या विक्रींतहि शोषण सपतें. शेती कधीहि सावकाराकडे जात नाही. अशा उत्तम योजनेनें सर्वांची प्रेरणा वाढेल. म्हणून प्रत्येक जण त्यास मिळालेल्या शेतीत खूप मेहनत करील व जास्तीत जास्त पीक घेईल.

प्रश्न :—सामूहिक शेतीस प्रेरणा कोठून मिळेल ?

उत्तर :—सामूहिक शेती झाल्यास पिकांची योजना उत्तम बनू शकते. कोणती जमीन कोणत्या पिकांस लायक आहे हें पाहून पेरणी होईल. श्रमविभागाचे फायदे मिळतील. म्हणून सामु-दायिक शेतीचे अनेक आर्थिक लाभ आहेत. पुन्हा मनुष्य हा सामा-जिक प्राणी आहे. मिळून काम करण्यांत व वाटून खाण्यांत एक अद्भूत आनद असतो. हे सर्व लाभ सामूहिक शेतीसाठी प्रेरणा देण्यास पुरेसे आहेत. गांवोगांव होणाऱ्या छोट्याशा सामूहिक शेतीचा प्रयोग सफल झाला. गावांतील खरेदीविक्रीसारखीं सहकारीं कामे सफल होऊं लागली म्हणजे व्यक्तिगत शेतीचे क्षेत्र कमी होईल व सामूहिक शेतीचे क्षेत्र वाढेल.

प्रश्न —ग्रामराज्य म्हणजे जुनी खेड्याची व्यवस्था पुन्हा आणणें आहे यानें प्रगतीच्या घड्याळाचे काटे मागे फिरविण्यासारखे होईल अशा ग्रामराज्यामुळे जीवनमान भलतेच खाली जाईल आधुनिक विज्ञानाचा व यंत्राचा सर्वोदयास तिटकारा असल्यामुळे पुन्हा सर्व दारिद्र्यात खितपत पडतील

उत्तर —हे प्रश्न नाहीत हे तर आक्षेप झाले आजच्या वीसाव्या शतकातील ग्रामराज्ये जुन्या ग्रामराज्यासारखी राहणार नाहीत म्हणून घड्याळाचे काटे पुढे जातील, कारण विज्ञानहि राहील व हिंसा जाईल विज्ञान व अहिंसा याचे लग्न झाल्याशिवाय आजचे जग टिकू शकणार नाही व सुखीहि होऊ शकणार नाही सर्वोदय यंत्राच्या विरोधी नाही सर्वोदय यंत्राचा अंध पुरस्कर्तांहि नाही जी यंत्र मानवाच्या कल्याणास पोषक आहेत उ घड्याळे, रेल्वे, सायकली अि राहतील मानव जातीचा नाश करणारी संहारक यंत्रे जातील उत्पादक यंत्रापैकी काही ठेऊ व काही सोडू पडित जमीन उठित करण्यासाठी ट्रॅक्टरचा उपयोग करू, पण उठित जमीनीच्या मशागतीकरिता पुष्कळ बैल उपलब्ध असताना ट्रॅक्टरचा उपयोग करणार नाही विवेकाने हें सर्व ठरवावें लागेल विज्ञानाचा व अहिंसेचा मेळ सर्वोदयात झाल्यामुळे युद्धामुळे ओढवणाऱ्या दारिद्र्यापासून व दु खापासून माणसे वचावतील

प्रश्न —ग्रामदानानंतर ग्रामराज्याची वा निर्माणकामाची जबाबदारी कोणावर आहे ? तितकीच ग्रामदाने मिळविली पाहिजेत जितक्याच्या नवनिर्माणाची जबाबदारी भूदानकार्यकर्ते साभाळू

मरतील अन्यथा नुसती गामदानें मिळविण्यात काय फायदा आहे ?

उत्तर —नुसत्या ग्रामदानानेंहि फायदा आहे विषमता मिटेल प्रथमच खेड्यात समाज बनेल नुसत्या समतेनेच गरीबाचे उत्पन्न दुप्पट तिप्पट होईल मजूर मन लावून काम करू लागतील त्यामुळे उत्पादन वाढेल ग्रामदान म्हणजे सुख दु ख वाटून घेणे नुसते वाटून घेण्यानेंहि दु ख कमी होते व सुख वाढते

ग्रामदानानतर निर्माणाची जबाबदारी साऱ्या समाजावर आहे विशेषत सर्व विधायक कार्य करणारे लोक व संस्था, राजकीय पक्ष, सरकार या सर्वांचे हें काम आहे सर्वांत प्रमुख जबाबदारी खेडेगावातील जनतेची आहे ज्या जनतेने ग्रामदान दिले, तिनेच पुढे ग्रामराज्याची चढण चढली पाहिजे म्हणून जितक्या गावात निर्माण कार्य कराल, तितकीच गावे ग्रामदानात मिळवा हें म्हणणे अयोग्य आहे उलट जितकी ग्रामदानें वाढतील, तितक्या प्रमाणात हवा बदलेल म्हणून पुढे निर्माणकामहि सोपे जाईल म्हणून ग्रामदाने मिळविण्यात खड पडू देऊ नये कारण गामदान हा पुढील सर्व निर्माण कामाचा पाया आहे

प्रश्न —ग्रामदानाचा विचार चागला आहे देशातील मोठमोठ्या पुढाऱ्यानी, धर्मगुरूनी, अर्थशास्त्रज्ञानी त्याची स्तुति केली आहे पण अेवढा मोठा त्याग जनता कशी करू शकेल ? भूदानकार्यकर्त्यांनी पायरी पायरीने चढावयास नको काय ?

उत्तर —ज्या ज्या वेळेस पुढचे पाऊल उचलले गेले, त्या त्या वेळेस मागचे पाऊल पुरे होते, उगीच घाई करण्याने नुकसान

होईल असे म्हटले जाते ज्या वेळेस सहाव्या हिश्याची मागणी भूदानासाठी केली गेली त्यावेळीहि ती जड वाटत होती आता ग्रामदानाचा विचार पुढे आल्यावर सहाव्या हिश्श्याची मागणी लोकाना हलकी वाटायला लागली सत्ताविसशे गावकऱ्यानी ग्रामदान देऊन ग्रामदानाचा विचार मानवजातीच्या आटोक्यातला आहे हे सिद्ध केले आहे वस्तुत हा त्यागाचा कार्यक्रम नसून प्रेम वाढविण्याचा कार्यक्रम आहे ह्यात कोणाला देयणऐवजी आपसात वाटून खावयाचे आहे व अेकमेकाच्या सुखदु खात सहभागी होऊन ग्रामराज्य स्थापन करावयाचे आहे गावाचे गोकुळ बनवावयाचे आहे गेल्या पाच वर्षापासून सतत सहाव्या हिस्याचा प्रचार चालू होता व लाखो लोकानी उचित हिस्सा दिला होता हा हिस्सा हे समतेचे, मालकी विमर्जनाचे पहिले पाऊल आहे हे स्पष्टपणे मागील पाच वर्षे सागितले गेले आता पाच वर्षे प्रचार व काही आचार केल्यावरहि पुढचे पाऊल न उचलणे म्हणजे अनत कालपर्यंत वाट पाहणे झाले असते

प्रश्न —समजा एका माणसाची ग्रामदानी गावात जमीन आहे व ती त्याने ग्रामदानात दिली आहे पण बाहेरच्या दुसऱ्या गावातहि त्याची जमीन आहे जी त्याने ग्रामदानात दिली नाही तर काय ते गृहस्थ ग्रामदानी समाजाचे सदस्य बनू शकतात ?

उत्तर —विनोबाजी म्हणतात की जर त्याने ग्रामदानी गावातील सारी जमीन देऊन टाकली असेल व तेथे तो रहात असेल तर तो ग्रामदानी ग्रामसभेचा सदस्य बन शकतो

प्रश्न —काय तो अेकावेळी अनेक ग्रामदानी गावाच्या ग्रामसभेचा सदस्य राहू शकतो ?

उत्तर —विनोबाजी म्हणतात की राहू शकतो  पण जेथे तो राहत नाही त्या गावात सदस्य राहण्याचा त्याने आग्रह का धरावा ? कारण अितक्या ठिकाणी ग्रामसभाच्या बैठकीस हजर राहणे त्याला शक्य होणार नाही  म्हणून ज्या गावात तो राहत नाही तेथे सदस्य बनण्याचा व तेथून काही आर्थिक लाभ घेण्याचा आग्रह त्याने ठेऊ नये

प्रश्न —ग्रामदानी गावातील अेक व्यक्ति बाहेर नोकरी करून पैसे मिळविते  तर काय तिने ती संपत्ति त्या गावास देऊन टाकावी ?

उत्तर —विनोबाजी म्हणतात की प्रत्येक गोष्ट प्रेमाने व विवेकाने झाली पाहिजे  जमीन दानात देऊन टाकली आहे  पण नोकरी करीत असेल तर तो आणखी काही मागणार नाही  पण जर त्याला ती पुरेशी नसेल तर तो अितरापेक्षा कमी जमीन मागू शकतो  किंवा अितराच्या बरोबर जमीन घेऊन तो आपल्या नोकरीचा पैसा गावास संपत्तिदानात देऊ शकतो

प्रश्न —जो ग्रामदानात सामील होत नाही त्याची जमीन गाववाले ठेक्याने घेऊ शकतात काय ? व त्याला त्याचा उचित हिस्सा मिळावा म्हणून काही कायद्याचा आधार त्याला मिळू शकतो काय ?

उत्तर —ग्रामदानात जमीन न देणारा माणूस शेतीवर स्वत श्रम न करणारा मोठा शेतकरी असेल व तो ग्रामदानापूर्वी आपली सारी शेती मजूराकडून करवीत असेल  पण ग्रामदानानतर मजूर

त्याच्याशी व्यक्तिश न बोलता ग्रामसभा बोलेल ती त्याला सागेल की तुमचे शेत आम्ही प्रेमाने करू व उत्पन्न तुमच्या घरी पोहचवू. अशा रीतीने प्रेमाने त्याला आम्ही जिंकू

"आम्हाला गोपाळकाला करावयाचा आहे प्रेम हेंच आमचे साधन कायदा, करार, शर्ती आमच्यापाशी नाहीत. आत या, प्रेम करा, प्रेम तुम्हाला मिळेल" असे विनोबाजी म्हणतात

प्रश्न ---ग्रामदानाने सर्वांना समान मिळकत होईल ही गोष्ट खरी, पण त्यामुळे लोकामधील कर्तबगारीची प्रेरणा कमी होणार नाही काय ? अधिक पुरुषार्थ करू तर अधिक सपत्ति मिळेल अशी आशा असेल तर लोक जास्त परिश्रम करतात

उत्तर ---घरात बाप जास्त काम करतो तो काय त्याला स्वत ला जास्त भाकरी मिळेल म्हणून करतो ? जो जितके कमावील तो तितके खाईल असें कुटुबात चालत नाही तरी सुद्धा काम करणाराला उत्साह असतो कुटुबात हे चालेल पण समाजात हा उत्साह टिकत नाही असें तुम्ही म्हणाल पण समाजात अशी अधार्मिकता आहे म्हणूनच तो टिकत नाही समाजात अनेक वाईट गोष्टी आहेत त्या काय आपण बरोबर आहे असे म्हणू ? जो जास्त कमावील त्याला भोगण्याचा जास्त अधिकार असें चालले आहे हा चुकीचा विचार आहे, अधर्म आहे या योगाने कर्मप्रेरणा वाढीला लागत नाही तर सग्रहप्रेरणा वाढीला लागते मी खूप काम करून पुष्कळ पैसा मिळविला आणि सग्रह केला तर मी आळशी बनतो,

माझी संतती आळशी व विलासी बनते, कार्मप्रेरणा क्षीण होते. समत्व अत्यंत सुरक्षित आहे. शेतकरी टेकाड फोडतो, गड्डे बुजवून सर्व समान करतो त्यानें पीक चांगले येतें. जो न्याय शेताला तोच समाजाला. म्हणून सर्वांत जास्त ताकत समानतेंत आहे. तराजू अगदी समान आहे. दुनियेचा सर्व व्यवहार तराजूनेंच चालतो. न्यायहि समत्वाच्या आधारावरच चालतो. तेव्हा आपल्या जीवनांत समानता आली तर त्यापासून आपलें नुकसान होईल अशी भीति कां धरावी ? मला जास्त पैसा मिळाल्याने जास्त काम करण्याची प्रेरणा मिळते तर दुसऱ्याला माझे पैसे लुटण्याचीहि प्रेरणा मिळते. मग हाहि उत्साह हवा आहे काय ? हें सारें दुष्ट चक्र आहे. म्हणून ग्रामदानाला भिऊं नका, संकोचूं नका. समतेने तुमची शक्ति वाढेल. असें विनोबाजी म्हणतात.

पुन्हा केवळ पैशाकरिताच लोक कामें करीत नाहीत. आजहि लोक पुण्याकरिता, कीर्तिकरिता, प्रतिष्ठेकरिता, न्यायाकरिता सामाजिक सेवेच्या आनंदाकरिता कामें करतात. ही मूल्यें क्रांतिनंतर समाजांत अधिकाधिक रूढ होतील. पैशाचें मूल्य जाईल. म्हणून लोकांची कर्तबगारी कमी न होतां वाढेल.

---

प्रकरण नववें

# सत्तावनची हांक

हे ग्रामवासी बंधूनो ! आपण एका गावात जन्मलो. एकाच गावात वाढलो येथील धरणीमातेने आपले पालनपोषण केले आपल्या मातेवर आपण आपली मालकी मानीत नाही मग ही धरणी तर हजारो वर्षांपासून लाखो लोकांची माता आहे. ही तर सर्वात श्रेष्ठ माता आहे हिचे आपण मालक कसे ? ही आपल्या जन्मापूर्वीहि होती व हिच्याच मांडीवर आपणास अखेरची विश्रांति मिळेल

जो गोष्ट जमीनीची तीच संपत्तीची संपत्तीचा अर्थच मुळी सर्वांद्वारा प्राप्त झालेली असा आहे संपत्ति ही अनेकांच्या सहयोगा-शिवाय पैदा होऊ शकत नाही मग तिचा कुणीहि एक मनुष्य मालक कसा होऊ शकतो ?

म्हणून खाजगी मालकीची कल्पना सत्यास धरून नाही ही कल्पनाच मुळी अपवित्र आहे आजच्या अनेक पापाचे ती मूळ आहे म्हणून या पापाचा बोजा फेकून देऊन आपण मोकळे होऊ या आणि ग्रामधर्माची दीक्षा घेऊ या सर्व मिळून गाव सुखी बनवू या यामुळे कलियुगाचे सत्ययुग होईल भूतलावर स्वर्ग येईल

भूदानसमित्यांच्या विसर्जनामुळे आता ग्रामदानाचें काम सर्वांचें झालें आहे. म्हणून सर्वांनी सत्तावनमध्यें हें काम पूर्ण करण्यास पुढे यावयास पाहिजे. पण हनुमंताप्रमाणे आज जनतेस आपल्या शक्तीचें भान नाही. तें भान करून देण्याचें काम जांबुवंताप्रमाणें कार्यकर्ते करीत आहेत.

जे या कामाकरिता सर्वस्व सोडूं शकणार नाहीत असे अन्य सहानुभूति बाळगणारे अनेक बंधु भगीनी खेड्यांत व शहरांत आहेत. त्यांनी आता स्वतःला आपल्या घराच्या चार भींतींत कैदेंत न कोंडतां किंवा स्वतःच्या मुलांबाळापुरतेच स्वतःला मर्यादित न करतां हें गांव माझें आहे, माझा संसार व गांवचा संसार अलग नाही तेव्हा गांवाच्या आड स्वतःचा स्वार्थ मी येऊं देणार नाहीं. असा संकल्प करावा. मी माझ्या जमीनीची मालकी सोडली, सत्तावनमध्यें या पापापासून मुक्त होणार हें ठरवावें व तसें जाहीर करावें. ग्रामदानाचा व ग्रामराज्याचा विचार गांवांतील लोकांत बसतांउठतां, चालतांबोलता फैलावीन असा निश्चय करावा.

गरीबांनी आपली जमीन वा श्रम देऊन ग्रामदानाची मागणी जाहीरपणें करावी. मूल रडूं लागलें म्हणजे त्याची भूक जाहीर होते. मग आई ती पूर्ण करते. अशा दात्यांनी गांवोगांवी सभा घ्याव्या व ग्रामदानाची मागणी करावी, ही मागणी हक्काने व प्रेमानें झाली पाहिजे. भूमातेची सेवा करण्याचा हक्क सर्वांना मिळाला पाहिजे. गरीबांनी व्यसनें सोडावी, आळस झाडावा. ग्रामदानांत आज ना उद्या जमीन सर्वांची होणार हें समजून उत्साहाने काम करावें. यामुळे त्यांची प्रतिष्ठा वाढेल व त्यांच्या मागणीस तेज येईल.

गरीबानी श्रीमतावर प्रेम करावे जे ग्रामदानात सामील होत नाहीत त्याच्यावर तर जास्तच करावे त्याना समजावून सागावे की तुम्ही वेगवेगळे राहत असाल तर राहू शकता तुम्ही बोलवाल तेव्हा आम्ही तुमच्या शेतात प्रेमाने मन लावून काम करू मग जमीनदार विचार करतील की ग्रामदानाने मजूर प्रेमळ व प्रामाणिक बनले, पीक चागले येऊ लागले , मग ग्रामदानातच का सामील होऊ नये ? अशा रीतीने जर आपण आपले वर्तन ठेवले तर जमीनदार वश झालेच समजा मगरोठचा राहिलेला एक जमीनदार आताच ग्रामदानात सामील झाला हा गरिबाकरिता ग्रामदानाचा कार्यक्रम झाला

श्रीमतानी खऱ्या देवाला नैवेद्य अर्पण करावा श्रीमत देवदर्शनासाठी हिमालय पर्वतावर व समुद्रकिनारी जातीत आणि ईकडे आपल्याच गावात खरा देव भक्ताची वाट पाहत आहे हा देव उपाशी मरत आहे थडीन कुडकुडत आहे, तहानेने तडफडत आहे याची पर्वा नाही या दरिद्रनारायणास नैवेद्य अर्पण करण्याची वेळ आली आहे आपला शेजारी दु खी, रोगी, अज्ञानी व बेकार असताना कोणता श्रीमत सुखी राहू शकेल ? खाणें, पिणे, चैन करणें, आपल्या मुलाबाळापुरते पाहणें तर पशुहि करतात आपण मानव आहात जो मनन करतो व विचार करतो तो मानव म्हणून श्रीमतानी आपली करुणा जागृत होऊ द्यावी माझ्या गावातील सर्व लोक जोपर्यंत जेवणार नाहीत तोपर्यंत मला जेवण गोड लागणार नाही, सर्व मुले जोपर्यंत शिक्षण घेत नाहीत तोपर्यंत माझ्या मुलाच्या शिक्षणात रस नाही असे मानावे. सर्वांस काम

देण्यात व गाव मुगी करण्यात आपली शक्ति, बुद्धि व युक्ति गर्च करावी.

इग्रजाची गुलामी या दशावर असताना, महात्मा गाधी, पडित मोतीलाल नेहरु, बॅरिस्टर चितरजन दास, देशगौरव सुभाषबाबू, लोकमान्य टिळक, लाला लाजपतराय, सरदार वल्लभभाई पटेल, पडित जवाहरलाल नेहरु, बाबू राजेन्द्रप्रसाद, खान अब्दुल गफारखा आदि अनेक अेकाहून अेक तेजस्वी पुढारी निर्माण झाले. त्यानी आपल्या घरादाराचा होम केला. त्यातून देश मुक्त झाला.

स्वराज्यास दहा वर्षे झाली. पण अजूनहि भारतातील करोडो खेडुत शोषण, दारिद्र्य, अज्ञान, रोगराई आदीनी गुलाम आहेत ते अपमान, अन्याय, जुलूम सहन करीत आहेत या गुलामीतून सुटण्याकरिता आपण पुढे सरसाऊ शोषणविहीन व शासनमुक्त समाज स्थापन करणे म्हणजेच सर्वोदयी समाज बनविणे हे आपले ध्येय आहे. महात्मा गाधीप्रमाणे सत विनोबाजी या कामासाठी राष्ट्रास हाक मारीत आहेत त्यास अखिल भारतीय कीर्तीचे बाबू जयप्रकाश नारायण, गुजरातचे रविशकर महाराज, उत्तर प्रदेशचे बाबा राघवदास, दक्षिणेतील श्री एस् जगन्नाथन् उत्कलचे शेकडो ग्रामदाने मिळविणारे विश्वनाथ पट्टनायक आदि अनेक सर्वस्वाचा त्याग करणारे नरवीर लाभले आहेत त्रेसष्ट वर्षाचे वृद्ध सत विनोबाजी मागील सहा वर्षापासून दररोज पायी फिरत आहेत वीस हजार मैलाची त्याची पदयात्रा झाली आहे

भारतमाता मुक्त झाली. पण अजूनहि आपली धरतीमाता खेडुताप्रमाणेच आज गुलाम आहे. म्हणून तिला सत्तावनमध्ये मुक्त करूं या. गाव अन् गाव ग्रामदान करू या. अशी विनोबानी हाक मारली आहे.

गरीबांनो व श्रीमतानो ! खेडुतांनो व शहरवासियानो ! नवयुवक बंधुभगिनीनो ! काय ही हाक आपणास ऐकूं येत नाही ? भारतमातेच्या मुक्तीकरिता जसे आपण महात्मा गाधीजीच्या हाकेसरशी लाखोंनी धावून गेलो तसे आपण या अैतिहासिक सत्तावन साली धरणीमातेच्या मुक्तीकरिता, संत विनोबाच्या हाकेस लाखोंच्या संख्येने ओ देणार नाही ? जिल्ह्याजिल्ह्यातून अनेक कार्यकर्ते घरादाराचा त्याग करून हे कार्य यावर्षी पूर्ण करण्याकरिता निघाले आहेत. कोणी पाटीलकी सोडली, कोणी मास्तरकीचा राजिनामा दिला, कोणी वकीली सोडली, भगिनींनी घरांस व आपल्या मुलांबाळांस सोडले, अविवाहितानी लग्ने पुढे ढकलली, म्हातारे एकुलत्या मुलाचें लग्न सोडून तानाजीप्रमाणे पुढे आले. अशा अनेक भक्तगाथा सत्तावनमध्ये निर्माण होत आहेत.

म्हणून आपण उठू या व धरतीमातेस मालकीच्या वेड्यांतून मुक्त करूं या. यातूनच ग्रामराज्य निर्माण होईल. हाच सत्तावनचा संदेश आहे. परमधर्म निर्माण झाल्यावर स्वधर्मंहि सोडावा लागतो. "सगळे धर्म सोडूनि एका शरण ये मज", असें भगवनाने गीतेत सांगितले आहे. वेचाळीसप्रमाणे सत्तावनची मागणी उपस्थित झाली आहे. पधरा वर्षे आपण विश्रांति घेतली. आता वेळ

थोडा राहिला आहे. आपण हें काम या वर्षी उरकवूं या. ग्रामदान हा जगांतील युद्धाची व लोभाची हवा शुद्ध करणारा आत्मबाँब आहे. दुसरीकडे अॅटमबाँब फुटत आहेत. आपण यावर्षी हा आत्मबाँब आपापल्या गांवांचें ग्रामदान करून फोडूं व विश्वशांति जवळ आणूं. सत्तावन सालीं आपापल्या घरींदारीं बसून जुन्या कामांत गढून राहणें पाप आहे. अठ्ठावनमध्यें ही सर्व कामें आपण ग्रामदानाच्या पायावर उत्तम रीतीनें करूं शकूं. पण एक वेळ हातचें गेलेलें सत्तावन साल पुन्हा परत येणार नाही. कारण सत्तावन हें हिंदुस्थानच्या नियतीचें वर्ष आहे. हाच ग्रामराज्याचा संदेश आहे. ग्रामराज्याकरिता सत्तावन सालीं सर्व खेड्यांत ग्रामदान ! धरणी-मातेची मालकीहक्कांच्या शृंखलांतून मुक्ति ! हीच सत्तावनची हाक आहे.

---

# ग्रामवासी व नगरवासी संवाद

खेडयात मुलाने आईस लोणी मागितलें तर त्याला ते मिळत नाही. म्हणतात ते विकावयाचे आहे ही सारी चर्चा भागवतात कृष्ण-यशोदा सवादात आलेली आहे कृष्ण लोणी वाटून टाकावे असे म्हणतो. यशोदा म्हणते 'ते आपण विकू ' कृष्ण उत्तर देतो, 'ज्या मथुरा शहरात लोणी विकले जाते तेथे पैसा आहे, पण त्या बरोबर कसहि आहे म्हणून कसाच्या पजातून सुटावयाचे असेल तर लोणी वाटून खाऊन टाकलें पाहिजे ' कृष्णाने लोणी वाटून खाल्ले मी विचारतो, "तुम्ही दूध, लोणी, फळें विकता का ? खात का नाही ? खाऊन उरल्यास पाहिजे तर विका या वस्तु तुम्हाला आवडत नाहीत काय ?"

[शेष कव्हर पृष्ठावर]

# ग्रा म दा न-प त्र

गवाचें नाव——— मौजा न ———— तालुका———— जिल्हा——— : ———प्रदेश

पू विनोबाच्या सागण्याप्रमाणे सारी जमीन बुद्धि व श्रम देवाचे—गावाचे आहेत ही गोष्ट मला पटली आहे आणि त्याप्रमाणे माझ्याकडे असलेल्या खाली लिहिलेल्या तपशिलाच्या जमिनीचा हक्क मी साऱ्या गावसमाजाकडे या माझ्या लेखाने अर्पण करीत आहें तसेच माझी सर्व बुद्धि व श्रमशक्ति देखील गाव-समाजाला अर्पण करीत आहे गावसमाज जी व जेवढी जमीन कसण्याकरिता व उपभोगण्याकरिता देईल ती मी खुपीने अणि माझी सर्व शक्ति खर्च करून कसेन व गावच्या उत्पन्नात भर टाकीन माझ्या या विश्वासाला देव साक्षी आहे

| तारीख | गावाचे एकूण क्षेत्र | कुटुबसख्या | लोकसख्या , |
|---|---|---|---|

| नाव ( सपूर्ण ) | स न | क्षेत्र | आकार | हक्काचा प्रकार | सह्या |
|---|---|---|---|---|---|